

# मराठ्यांचे आरमार

## The धुळप 's Era

**योगेंद्र उर्फ राज चंद्रकांत मेमाणे**

श्रीमद्धर
पब्लिकेशन

**मराठ्यांचे आरमार, The धुळप'S Era**
योगेंद्र ऊर्फ राज चंद्रकांत मेमाणे

**प्रकाशन संस्था** – श्री मल्हार पब्लिकेशन,
१४३७, सदाशिव पेठ, नंदन अपार्टमेंट, पुणे – ३०.

**मुखपृष्ठ, रेखाचित्रे आणि नकाशे** – श्री. चैतन्य अभिजीत अष्टेकर (कोल्हापूर)

**अक्षर जुळणी, अंतर्गत मांडणी व मुद्रक** – कुमार प्रिंट्स, १३८, शनिवार पेठ, पुणे – ४११०३०

**प्रथम आवृत्ती** – २० जून २०२४ (३५१ वा शिवराज्यभिषेक दिन)

**मुद्रितशोधन** – श्री. सतीश समर्थ,

**किंमत** – ३५०/–

## अर्पणपत्रिका

मराठा आरमाराचे संस्थापक छत्रपती श्री शिवाजी महाराज आणि धुळप घराण्यातील दर्याधुरंधर सुभेदार रुद्राजीराव धुळप, सुभेदार आनंदराव धुळप, कृष्णाजीराव धुळप, जानोजी ऊर्फ जानराव धुळप, भगवंतराव धुळप, हरबाजीराव धुळप, लक्ष्मणराव धुळप, बाबुराव धुळप, आपाजी धुळप, दौलतराव धुळप यांच्या पवित्र स्मृतीस अर्पण!

# प्रस्तावना

आज्ञापत्रात म्हटलंच आहे की, आरमार हे स्वतंत्र राज्यांगच; ज्याचे आरमार त्याचा समुद्र हे यथार्थ वर्णन आज इतिहास अभ्यासकांच्या जिवाभावाचं आहे. आरमार म्हटलं की डोळ्यांसमोर उभा राहतो डौलदार नौकांचा समूह. छत्रपती शिवरायांनी मराठा आरमाराची स्थापना केली. खरं तर त्यापूर्वीही भारतात अनेकांची आरमारे होती. पोर्तुगीज दप्तरात तर मालोजी नावाच्या एका विजापुरी सरदाराने स्वतंत्र आरमार बांधण्याचा प्रयत्न केला व नंतर ते पोर्तुगीजांच्या सहाय्याने आदिलशहाने तोडलं, असा उल्लेख सापडतो. यात दिसणारी महत्त्वाची गोष्ट अशी की, ज्या साम्राज्याला श्रीलंकेचा राजाही वचकून होता, त्या साम्राज्याला एका सरदाराचं आरमार मोडायला पोर्तुगीजांची मदत घ्यावी लागली. मध्ययुगात आरमाराची ताकद काय होती, हे सांगण्यासाठी हा पुरावा यथार्थ आहे. आरमार मुख्यत्वेकरून दस्तकासाठी असे. ज्याचे आरमार त्याचा समुद्र या नियमाने समुद्रावर मालकी आली, की तिथून जाणाऱ्या मालवाहू नौकांना कर देणे क्रमप्राप्त ठरत असे. हा कर गोळा करायला, दस्तक म्हणजे परवानगी असे याचे पैसे सरकारात मिळत. उत्पन्नाचे हे चांगले साधन असे. आरमाराच्या मदतीने युद्धही केली जात. किनाऱ्याजवळच्या युद्धांसाठी आरमारी ताकद ही मदत स्वरूपात उभी असे. जवळपास सगळ्याच युरोपियन सत्ता आरमाराच्या जीवावर भारतात आल्या. त्यांचा व्यापार, नित्यनियमाने होणारे पत्रव्यवहार आरमाराच्या मदतीने होत असत. म्हणून शिवरायांची नीती सांगणारे अमात्य म्हणतात, आरमार हे स्वतंत्र राज्यांगच! ही गोष्ट पदोपदी सिद्ध होते.

आता राज्याचे जे नियम असतात तेच आरमाराला लागू होतात. राज्य चालवताना जसे एक प्रशासन असे तसेच एक वेगळं प्रशासन आरमारासाठीही असे, याचंच आकलन म्हणजे आरमार समजून घेणे होय.

राज्य हे शेतकरी करावर आणि चौथाई इत्यादींवर चालत असे, तर आरमार व्यापारी करांवर चालत असे. यात फरक असा आहे की, आरमार चालवायला तंत्रज्ञानाची गरज आहे. प्रचंड पैसा त्यासाठी गरजेचा आहे. शिवरायांचं राज्य हे कोंकण किनारपट्टीला लागून असल्याने त्यांना या आरमारी ताकदीचा अंदाज येणं स्वाभाविक होतं. आरमार ही एक कलाही आहे. मुघलांची ताकद भारतभर होती; पण आरमाराच्या

बाबतीत त्यांना तुलनेने तडजोड करावी लागे. समुद्राचे नियम वेगळे होते. उदा. ज्याच्या किनाऱ्यावर फुटलेली बोट लागेल ती बोट त्या किनाऱ्यावरील सत्ताधीशाची होत असे. नानासाहेब पेशवा तर आरमाराच्या बाबतीत म्हणे, आरमाराची मिळकत थोडी व खर्च फार आहे, म्हणून जरूर रवानगी करावे असे नाही. दृष्टिकोनात फरक कसा पडतो तर तो असा.

छत्रपती शिवरायांच्या आरमाराचा दरारा होता. पहिल्यांदा हेटाळणी करणारे इंग्रज नंतर मराठ्यांनी बनवलेल्या नौकांचं कौतुक करताना दिसतात. शिवरायांच्या पश्चात आरमाराचं प्रमुखपण आंग्रेंकडे आलं. सरखेल कान्होजी आंग्रेंनी समुद्रावर आपला दरारा निर्माण केला. आंग्रेंचा कागदपत्रांचा विस्तार पाहिल्यास ती एक आंग्रेशाहीच होती असं म्हणावं लागेल. पुनश्च, आरमार स्वतंत्र स्वराज्याचं अंग याचा अनुभव येतो. पुढे आंग्रे यांच्या घरात वाद सुरू झाले; त्यातून एकाकडे विजयदुर्ग आणि दुसऱ्याकडे सुवर्णदुर्ग अशी वाटणी झाली. पुढे ह्या वादात पेशव्यांना उतरावं लागलं. पेशव्यांनी स्वत:चं आरमार उभं केलं. कोणत्याही राज्यकर्त्याला सुसूत्रपणासाठी प्रत्येक गोष्टीवर पकड ठेवणं भाग असतं, तोच प्रकार पेशव्यांनी केला. मानाजी आंग्रेची स्थापना आम्ही केली; पण त्याजपासून पैका काही मिळत नाही, असे चिमाजी आप्पाने म्हटले आहे. या वादातूनच पुढे धुळपांचा उदय झाला असे म्हटले तर वावगे ठरू नये.

नानासाहेब पेशव्याने इंग्रजांची मदत घेत तुळाजी आंग्र्यांविरोधात युद्ध केलं. त्यात इंग्रजांना बक्कळ पैका व काही भूभागही मिळाला. स्वाभाविक, राष्ट्रीय इतिहासकारांना नानांची ही गोष्ट खटकली. यानंतर जनमानसात नानांनी मराठ्यांचं आरमार बुडवलं, हा समज दृढ झाला. इंग्रज हे आपले बाहेरचे शत्रू आपल्याला गिळू पाहत आहेत, ही समज नानांना नव्हती, हा मुख्य आरोप. वास्तविक, काळाच्या पुढे फारसा कोणी नसतो. दूरदृष्टी ज्याला म्हणतात ती वर्तमान आणि इतिहासातल्या चुकांवर ठरत असते. आज जशी भारत ही संकल्पना आहे तशी त्या काळात नव्हती. यामुळे बिचाऱ्या नानांकडे हा दोष जात नाही. इंग्रज राज्य घेतील हे इंग्रजांना तरी कुठे फारसं माहीत होतं? थोडक्यात, नानांमुळे आरमार बुडालं हा आरोप खोटा ठरतो.

या पुस्तकाचा विचार करता नंतरच्या काळात धुळपांकडे आलेल्या आरमाराची सूत्रे आणि त्यांचा इतिहास पाहिला तर नानांवरचा हा आरोप गळून पडतो. धुळपांचा इतिहास आंग्र्यांसारखाच पराक्रमी आहे याची जाण हे पुस्तक करून देतं. पोर्तुगीज नंतर म्हणतातच की, समुद्रावर

दुसऱ्या आंग्रेंचा उदय झाला आहे, यातच धुळपांचं महत्त्व कळतं. सदरहू पुस्तकात धुळपांचा पराक्रम, त्यांचं प्रशासन, स्वामीनिष्ठा यांचा अनुभव ठायीठायी येतो. आरमार म्हणजे एक वेगळं राज्यच! यामुळे तिथल्या चालीरीती, अडचणी, कायदेकानू यांचा विचार करणे क्रमप्राप्त आहे. या पुस्तकाने यावर प्रकाश टाकला आहे. धुळप स्वारी करताना 'हेट' म्हणजे खाली, 'उपर' म्हणजे वर, 'मावळण' म्हणजे पश्चिम असा विचार करत. धुळपांच्या काळातही मराठा आरमार प्रचंड होतं, याची कल्पना हे पुस्तक वाचल्यावर येते. तत्कालीन चालीरीती, समज यांचाही उल्लेख या पुस्तकात आहे. आरमार धड्याला लावणे म्हणजे किती कष्टाचे काम होते, याचा अनुभव येतो.

आरमारासंबंधी अशीच एक नोंद आहे, आरमार अक्षयतृतीयेपासून वरते ओढून घ्यावयाचा आरंभ करावा लागतो. पर्जन्याअगोदर वरते न घेतले तर आरमाराचा मनसबा खराबीस मिळेल. त्यामुळे लोक आरमाराला जिवापाड जपत.

आमसुलाचे सरबत कोंकणात प्रसिद्ध आहे; याला २५० वर्षांचा इतिहास आहे, हे या पुस्तकातून समजतं. कोंकण प्रदेशात आरमारी स्वारीच्या वेळी देवदेवतांना तोफांचे बार काढण्याचे उल्लेख यात आहेत. नवस फेडण्यासाठी छोट्या तोफा दिल्या, अशी गमतीदार गोष्ट आहे. आरमारी नौकांची पुनर्बांधणी, त्यांचं व्यवस्थापन ह्या गोष्टी पुस्तकातून दिल्या आहेत. पूर्वी जखमा झाल्या तर औषध कसं बनवत वगैरे गोष्टी यात दिसतात. याशिवाय अजून एक महत्त्वाची नोंद दिसते; ती अशी की, मराठा आरमार दिमाखात दिसावं, असं धुळपांना वाटे म्हणून आरमाराची तुलना ब्रिटिश आरमाराशी करून ते निशाण खाली लावतात, म्हणून आपणही आपले निशाण खाली लावावे, अशी परवानगी पेशव्यांकडून घेतली. यातून हे समजतं की धुळपांना दिमाखही आवडे, या बदलासाठीही पुण्याची परवानगी घ्यावी, हे स्वामीनिष्ठेचे उत्तम उदाहरण आहे. आरमारी लढाईत दोन नौका एकमेकांना टक्करही देत असत. नौका दर्यागर्क झाल्याचे उल्लेख या पुस्तकात आहेत. असे असंख्य उल्लेख या पुस्तकात प्रथमच प्रकाशित होत आहेत, याचा मनस्वी आनंद वाटतो. इतिहास निव्वळ लढायांचा नसून अनेक अंगांचा त्यात विचार हवा, हे यातून सिद्ध होते. धुळपांनी केलेल्या लढाया पाहिल्यास त्यांचा पराक्रम प्रचंड होता, धुळपांनी समुद्रावर राज्य केलं, असं म्हणायला हे पुस्तक भाग पाडतं. धुळपांच्या सैन्यात मुसलमान लोकही असत. शेवटी हिंदूधर्मास कोणी त्याज्य नाही. सुखाने जगा आणि जगू द्या, हा न्याय पदोपदी दिसतो. प्रस्तुत पुस्तक अशा अनेक शंकांना योग्य उत्तर देईल. वास्तविक, आजवर प्रस्तावना हा प्रकार सहसा लेखक

त्याहून जास्त अभ्यास किंवा आदरणीय व्यक्तींकडून घेत असतो असा प्रघात आहे. श्री. मेमाणेंनी मला प्रस्तावना लिहायला सांगितली ते त्यांच्या मैत्रीच्या प्रेमापोटी. मी लेखकही नाही आणि कोणी विचारवंतही नाही. एका वाचकाकडून प्रस्तावना लिहून घेण्याचा प्रसंग पहिल्यांदाच होत असेल. मी याबद्दल त्यांचा ऋणी राहीन. पुस्तकातली गावे, देवांची नावे माझ्या बालपणी आणि गावाच्या ठिकाणची असल्याने मला याबद्दल जरा जास्त आपुलकीवजा कुतूहल वाटलं. तळकोंकणातल्या देवगडसारख्या ठिकाणालाही एक सुंदर इतिहास आहे, याच्या नोंदी या पुस्तकात मिळाल्या. हा गाव श्री. मेमाणेंचा आभारी राहील. एकंदरीत, अशी अजून पुस्तके आम्हा वाचकांसमोर यावीत, ही माझी अपेक्षा आहे. सदरहू पुस्तक पेशवाईवरचे आरोप नक्कीच खोडून काढेल, हा विश्वास आहे. श्री. मेमाणे आणि या पुस्तकास माझ्या खूप साऱ्या शुभेच्छा!

**शिवराम कार्लेकर**

**विशेष आभार :**

पुणे पुरालेखागार –

श्रीमती शैलजा जंगम (सहाय्यक संचालक, पुणे पुरालेखागार), श्रीमती सुनीता वाघमारे,
श्री. संजय गुजले, श्री. सुनील पाटील आणि पुणे पुरालेखागारातील सर्व कर्मचारी वर्ग.

श्री. मंदार लवाटे (ज्येष्ठ इतिहास संशोधक), डॉ. गिरीश मांडके, श्री. शिवराम कार्लेकर, श्री. आशीष कुलकर्णी,
श्री. चैतन्य अष्टेकर, श्री. निखील बेल्लारीकर, श्री. नील सीते, श्री. जानराव धुळप,
श्री. अमित (यशवंतराव) रघुनाथराव धुळप, श्री. सौरभ करडे, श्री. अवधूत पाटील.

॥ श्री गणेशाय नमः॥ ॥ श्री सरस्वत्ये नमः॥ ॥ श्री कुलस्वामिनी नमः॥ ॥ श्री म्हाळसाकांताय नमः॥ ॥ श्री स्वामी समर्थ नमः॥

## (मनोगत)

मराठ्यांचे आरमार The धुळप'S Era हे माझे सहावे संशोधनात्मक पुस्तक. त्या आधीचे म्हणजेच पाचवे पुस्तक, महाराजांचे गड-दुर्ग खंड १ प्रकाशित झाल्यानंतर त्याच पुस्तकाच्या दुसऱ्या खंडाची तयारी करत असताना अचानक आरमारविषयक मोडी कागदपत्रे वाचनात आली आणि या कागदपत्रांतून कल्पनाही केली नव्हती इतकी अप्रकाशित माहिती सापडली. त्यातूनच या पुस्तकाची निर्मिती होत आहे. या पुस्तकातून मराठ्यांच्या इतिहासात जी मोलाची भर पडणार आहे त्यात प्रामुख्याने दोन गोष्टींचा समावेश आहे. एक म्हणजे इसवी सन १७५६ मध्ये तुळाजी आंग्रे विरुद्ध पेशवे आणि इंग्रज या संघर्षात पेशव्यांनी मराठा आरमार संपूर्णपणे बुडविले, असा जो आरोप होतो तो केवळ एक अपसमज आहे. दुसरी म्हणजे दर्याधुरंधर धुळप घराण्याने मराठा आरमारासाठी दिलेले महत्त्वपूर्ण योगदान व तुळाजी आंग्रे यांच्यानंतर कायम ठेवलेला मराठा आरमाराचा दरारा इत्यादी अनेक गोष्टींविषयक महत्त्वाची अप्रकाशित माहिती अगदी विस्तृत स्वरूपात वाचायला मिळेल. सुमारे ५ ते ६ दशके धुळप घराण्यातील धुरंधरांनी मराठा आरमार उत्तमरीत्या सांभाळले. थोडक्यात सांगायचे झाले तर यापुढील काळात आंग्रे घराण्यानंतर ज्या घराण्याचे नाव मराठा आरमाराच्या इतिहासात अजरामर होईल आणि अत्यंत आदराने घेतले जाईल ते घराणे म्हणजे धुळप घराणे होय. चला तर मग, इसवी सन १७६० ते १७९५ या सालातील दर्याधुरंधर धुळप घराण्याच्या देदीप्यमान इतिहासाची समुद्री सफर सुरू करूयात.

- योगेंद्र ऊर्फ राज चंद्रकांत मेमाणे

* अनुक्रम *



***

## ॥ श्री गणेशा ॥

**प्रकरण १ :**

# दर्याधुरंधर धुळप

इसवी सन १६५७ साली छत्रपती शिवाजी महाराजांनी कल्याणच्या किल्ले दुर्गाडी येथे मराठा आरमाराची स्थापना केली. तेव्हापासून सुरू झालेला मराठा आरमाराचा प्रवास सुमारे दीडशे–दोनशे वर्षे चालू होता. या काळात अनेक वीरांनी आरमाराच्या जडणघडणीत मोठे योगदान दिले. जसे की, मायनाक भंडारी, दौलतखान; आंग्रे घराण्यातील कान्होजी आंग्रे, सेखोजी आंग्रे, संभाजी आंग्रे, तुळाजी आंग्रे इत्यादी. यांशिवाय आणखी एका पराक्रमी घराण्याचे अत्यंत महत्त्वाचे योगदान मराठा आरमाराच्या जडणघडणीत आहे. ते घराणे म्हणजे दर्याधुरंधर धुळप घराणे.

**धुळप हे जावळीच्या मोऱ्यांचे वंशज :**

विजयदुर्गचे धुळप घराणे हे जावळीच्या चंद्रराव मोरे यांचे वंशज. याविषयीची विस्तृत माहिती श्री. गोपाळ दाजीबा दळवी लिखीत 'मराठा कुळांचा इतिहास' या पुस्तकात दिलेली आहे. त्यातील माहितीनुसार मोरेंच्या कुळातील एक वंशज कोंकणातल्या खेडजवळील घिवरे बंदरानजीक गावशा बंदर, ध्रुवमंडळ येथे आले आणि 'ध्रुवमंडळ' या शब्दावरून त्यांचे आडनाव 'धुळप' असे पडले. या पुस्तकाचा विषय धुळप घराण्याचे मराठा आरमाराविषयीचे योगदान यावर आधारित असल्याने फक्त त्याच विषयाशी संबंधित गोष्टींचा ऊहापोह इथे केला आहे. धुळप घराण्यातील ज्या कर्तृत्ववान पुरुषाचा सर्वांत आधी मराठा आरमारात प्रवेश झाला, ते म्हणजे सरदार रुद्राजीराव धुळप होय. मराठा आरमाराची धुरा कान्होजी आंग्रेकडे असताना रुद्राजीराव धुळप सुवर्णदुर्ग येथे अंमलदार म्हणून कार्यरत होते. पुढे छत्रपती थोरले शाहू महाराज, सातारा यांच्या कारकीर्दीच्या अखेरच्या काही वर्षांत पेशवे आणि तुळाजी आंग्रे यांचे संबंध खराब झाले. शाहू महाराजांच्या निधनानंतर पेशव्यांनी इसवी सन १७५६ साली इंग्रजांच्या आरमाराची मदत घेऊन तुळाजी आंग्रे यांचा विजयदुर्ग येथे पराभव केला आणि त्यांना अटक केली. सांगोला करारानंतर मराठा साम्राज्याची धुरा पेशव्यांकडेच असल्यामुळे साहजिकच आरमाराचा

ताबाही त्यांच्याकडेच आला.

**पेशव्यांमुळे मराठा आरमार बुडाल्याचा अपसमज :**

नानासाहेब पेशव्यांनी इंग्रजांची मदत घेऊन तुळाजी आंग्रे यांचा पराभव केला आणि मराठा आरमार संपूर्णतः नष्ट केले, असा एक अपसमज आहे. ही गोष्ट खरी आहे की, विजयदुर्ग येथे तुळाजी आंग्रे यांचा पराभव पेशवे आणि इंग्रजांनी केला. त्यावेळेस आरमाराचे मोठे नुकसान झाले; परंतु आरमार नष्ट केले, हा आरोप सर्वतः चुकीचा आहे. पेशव्यांनी आरमाराचा ताबा घेऊन पुढील काळात रुद्राजीराव धुळपांकडे आरमाराची जबाबदारी दिली आणि धुळप घराण्यातील कर्तृत्ववान पुरुषांनी मराठा आरमाराचा तोच दरारा सागरावर कायम ठेवला जो आंग्रे यांच्या कारकिर्दीत होता. पेशवे दप्तरातील विजयदुर्गचे मोडी कागद बघितल्यावर या गोष्टी अगदी सहज लक्षात येतात.

**पेशव्यांनी नव्याने बसविलेली घडी :**

पेशव्यांनी आरमाराचा ताबा घेतल्यानंतर विजयदुर्ग येथील आरमाराची जबाबदारी नारो त्रिंबक यांच्याकडे दिली. इसवी सन १७६१ सालापर्यंत नारो त्रिंबक आरमाराचा कारभार पाहत होते. परंतु त्याविषयीची कागदपत्रे अत्यंत अल्प प्रमाणात उपलब्ध असल्याने त्या कागदपत्रांतून आरमारविषयक म्हणावी इतकी विस्तृत माहिती मिळत नाही. कदाचित पेशव्यांकडे आरमार आल्यानंतरचा तो प्रारंभिक काळ असल्यामुळे आरमाराची घडी नव्याने बसविण्याचे काम चालू असावे. इसवी सन १७६०-६१ मध्ये मराठा आरमाराने उंदेरी आणि कासा (पद्मदुर्ग) या दोन जलदुर्गांवर चढाई केली होती. यावेळेस उंदेरी मराठ्यांनी जिंकला. या लढाईतील प्रमुख सरदार रुद्राजीराव धुळप होते. त्यांनी या लढाईत चांगला पराक्रम केला. बहुदा त्यामुळेच इसवी सन १७६१-६२ सालात पेशव्यांनी आरमाराची धुरा रुद्राजीराव धुळप यांच्याकडे दिली असावी. इसवी सन १७६१-६२ ते १७९५-९६ अशी सुमारे ३५ वर्षांची विजयदुर्ग येथील आरमाराविषयीची विपुल कागदपत्रे पुणे पुरालेखागारात उपलब्ध आहेत. त्यातून रुद्राजीराव धुळप आणि त्यांच्या घराण्यातील अनेक पराक्रमी पुरुषांनी मराठा आरमारासाठी दिलेले योगदान व कार्यकर्तृत्व यांविषयीची भरपूर माहिती मिळते. धुळप घराण्याच्या मराठा आरमारासाठी दिलेल्या असामान्य योगदानाचा आणि मोठ्या प्रमाणावर अप्रकाशित असलेल्या इतिहासाचा आढावा या पुस्तकातून घेण्याचा प्रामाणिक प्रयत्न करण्यात आला आहे.

**दर्याधुरंधर धुळप :**

धुळप घराण्यातील पराक्रमी पुरुषांनी मराठा आरमाराची जबाबदारी

समर्थपणे पेलली आणि इसवी सन १७६१ पासून पुढे सुमारे पाच ते सहा दशके मराठ्यांच्या आरमाराचा दबदबा पूर्वीप्रमाणेच कायम ठेवला. पुणे पुरालेखागारात असलेल्या पेशव्यांच्या दप्तरातील मोडी कागदपत्रांतून जी माहिती मिळाली, त्यावरून हे निश्चित समजते की या काळातही मराठ्यांच्या आरमाराची दहशत इंग्रज, पोर्तुगीज, डच, फ्रेंच आणि समुद्री चाच्यांना होती. पुणे पुरालेखागारात विजयदुर्गशी संबंधित असलेली मोडी कागदपत्रे इसवी सन १७६१ ते १७९५ अशी जवळपास ३५ वर्षांची आहेत. त्यापुढील कालखंडातील कागदपत्रे पुढील काळात आढळल्यास त्याविषयीचा तपशील अजून एखाद्या पुस्तकातून मांडण्याचा प्रयत्न करेन. इसवी सन १७६१ ते १७९५ या अशा एकूण ३५ वर्षांपैकी जवळपास ३० वर्षे विजयदुर्ग येथील आरमाराची सुभेदारी धुळप घराण्याकडे होती. मधल्या काळात म्हणजेच इसवी सन १७६९–७० या वर्षी मोत्याजीराव विचारे यांच्याकडे आणि इसवी सन १७८६–८७ ते इसवी सन १७९१–९२ या काळात आरमाराची मामलत गंगाधर गोविंद यांच्याकडे होती. गंगाधर गोविंद यांच्या काळात आरमाराच्या फारशा स्वाऱ्या झाल्याचे कागदपत्रांतून दिसून येत नाही. तसेच, उत्पन्नातही थोडीफार घट झाल्याचे दिसून येते. बहुदा त्यामुळेच गुरुवार दिनांक २२ डिसेंबर १७९१ या दिवशी पुन्हा एकदा रुद्राजीराव धुळप यांचे चिरंजीव आनंदराव धुळप यांना आरमाराची सुभेदारी दिली. त्यानिमित्त आनंदराव धुळप, हरबाजी धुळप यांना मानाची वस्त्रे देण्यात आली.

**धुळप घराण्यातील पराक्रमी पुरुष :**

रुद्राजीराव, कृष्णाजीराव, जानराव आणि भगवंतराव हे चौघे बंधू, रुद्राजीराव धुळप यांचे चिरंजीव आनंदराव, जानराव यांचे पुत्र हरबाजीराव यांनी मराठा आरमारात मोठी कामगिरी केली. याशिवाय बाबुराव धुळप, आपाजी धुळप आणि लक्ष्मणराव धुळप यांचीही नावे कागदपत्रांतून येतात; मात्र ते कोणाचे कोण, हे समजून येत नाही. आपाजीरावांचे पुत्र दौलतराव धुळप हे होते. रुद्राजीराव, जानराव, भगवंतराव, कृष्णाजीराव, आनंदराव इत्यादी सर्वांनाच सरकारातून पालखीचा मान होता. या सर्वांच्या पराक्रमाविषयी पुढील प्रकरणांतून माहिती वाचता येईल. धुळप घराण्यातील या दर्याधुरंधरांची कागदपत्रांतून जी माहिती मिळते, तिचा तपशील पाहूयात.

**रुद्राजीराव धुळप :**

आंग्र्यांचे सरदार असलेल्या रुद्राजीराव धुळप यांच्याकडे पेशव्यांनी आरमाराची जबाबदारी इसवी सन १७६१–६२ सालात दिली आणि त्यांची विजयदुर्ग येथे सुभेदार म्हणून नेमणूक केली. रुद्राजीराव धुळप

यांनी सुमारे दोन वर्षे आरमाराचे सुभेदार म्हणून काम पाहिले. या दोन वर्षांत त्यांनी अनेक समुद्री स्वाऱ्या करून मराठा आरमाराचा दरारा पुन्हा निर्माण करण्याच्या कामास सुरुवात केली. त्यांच्या हयातीतच आनंदराव धुळप यांच्याकडे आरमाराची धुरा आली, असे कागदपत्रांतून आढळून येते. रुद्राजीराव धुळप यांच्या मृत्यूविषयीची नोंद इसवी सन १७६५ च्या एका कागदातून पाहायला मिळते. त्यानुसार गुरुवार, १४ फेब्रुवारी १७६५ या दिवशी रुद्राजीराव धुळप मृत्यू पावले. त्यांच्या पुत्रांस व बंधूंना दुखवट्याची वस्त्रे दिली गेली. ४० रुपयांची वस्त्रे आनंदराव धुळप यांना, ३० रुपयांची वस्त्रे कृष्णाजी धुळप यांना तर ३० रुपयांची वस्त्रे भगवंतराव आणि जानराव यांना दिली गेली.

**आनंदराव धुळप :**

रुद्राजीराव यांच्या हयातीतच पेशव्यांनी आनंदराव यांच्याकडे आरमाराची सुभेदारी दिली. आरमाराचे सुभेदार म्हणून आनंदराव यांनी दीर्घकाळ काम केले. पेशवे दप्तरातील कागदपत्रांवरून असे दिसून येते की, त्यांच्याकडे मराठा आरमाराची सुभेदारी इसवी सन १८०६ पर्यंत होती. त्यांनीही आपल्या वडिलांप्रमाणेच समुद्री लढाया करून मोठा पराक्रम केला आणि मराठा आरमार उत्तमरीत्या सांभाळले.

**जानराव धुळप :**

रुद्राजीराव यांचे बंधू जानोजी ऊर्फ जानराव धुळप यांनीही मराठा आरमाराकडे सरदार म्हणून बरीच वर्षे काम पाहिले. त्यांच्याही भीमपराक्रमाच्या गाथा मोडी कागदपत्रांतून दिसून येतात. इसवी सन १७६१–६२ या साली त्यांना नाना फडणीस यांच्याकडून पालखीचा मान देण्यात आला. त्यांचा मृत्यू रविवार, १६ मार्च इसवी सन १७७७ रोजी झाला.

**हैदर अलीचा बंदोबस्त करण्यास जानरावांची नियुक्ती :**

इसवी सन १७६३–६४ या साली हैदर अलीने कोंकणातील सौंधे आणि कर्नाटकातील बिदनूर या प्रांती ठाणी बसवली होती. त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी थोरले माधवराव पेशव्यांनी जानरावांची नियुक्ती केली होती. ही दोन्ही ठाणी सोडविताना जानरावांना ज्या गोष्टी लागतील जसे की, दारूगोळा इत्यादी ती मदत इंग्रजांनी आपल्या बैनावर बंदरात असलेल्या वखारीतून करावी, असे पेशव्यांनी इंग्रजांना बजावले होते.

**कृष्णाजीराव धुळप आणि भगवंतराव धुळप :**

कृष्णाजीराव आणि भगवंतराव यांनीही मराठा आरमारात महत्त्वाची कामगिरी बजावली. कृष्णाजीराव धुळप इसवी सन १७७८–७९ या

साली मृत्यू पावल्याचा उल्लेख कागदपत्रांतून येतो. तसेच भगवंतराव धुळप हे गुरुवार, १ सप्टेंबर १७७४ रोजी मृत्यू पावले. याच वर्षी आपाजीराव धुळप यांचाही मृत्यू झाला. त्यांच्या जागी त्यांचे चिरंजीव दौलतराव धुळप हे आरमारात रुजू झाले.

**हरबाजीराव धुळप :**

इसवी सन १७६३–६४ साली जानराव धुळपांनी आपले चिरंजीव हरबाजीराव धुळप यांना आरमाराकडे रुजू करून घ्यावे, अशी विनंती थोरले माधवराव पेशव्यांना केली. त्यावरून हरबाजीराव धुळप यांना १०० स्वारांसहित आरमाराकडे रुजू करून घेतले.

**धुळपांचे वार्षिक उत्पन्न आणि मोकासा असलेली गावे :**

आनंदराव धुळप यांना मौजे फणसगाव तर्फ खारेपाटण हा गाव मोकासा होता. या गावातून वार्षिक १२०० रुपये इतकी रक्कम धुळप यांना मिळत असे. तसेच इसवी सन १७७१–७२ या सालात पेशव्यांनी आनंदराव धुळप यांना कुटुंबाच्या खर्चासाठी १००० रुपये उत्पन्न असलेला कराड प्रांतातील मौजे कोपर्डे हा गाव नेमून दिला होता. याशिवाय इसवी सन १७७० मधील नोंदीनुसार प्रतिवर्षी जानराव धुळप यांना १८०० रुपये, आनंदराव धुळपांना १२०० रुपये, भगवंतराव धुळपांना ७०० रुपये, कृष्णाजी धुळपांना ५०० रुपये आणि आपाजी धुळप यांना ३०० रुपयांची नेमणूक सरकारातून होती. याशिवाय सुमारे १५८० रुपयांचे ३९ खंडी धान्य, २०० रुपयांचे किरकोळ जिन्नस जसे की, तूप, सुपारी, तंबाखू इत्यादी आणि ३० रुपये दिवटीच्या तेलासाठी सरकारातून दिले जात असत.

**धुळप यांच्याकडे असलेले इतर सुभे :**

इसवी सन १७६३–६४ साली मर्दनगड तालुका आणि पंचमहाल येथील सुभा जानराव धुळप यांच्याकडे सोपवावा, असे थोरले माधवराव पेशव्यांनी पोर्तुगीजांना सांगितले होते. याबाबत पोर्तुगीज आणि मराठे यांच्यात तह झाला असावा, परंतु पोर्तुगीजांनी सुभा सोपवण्यास वेळ लावला म्हणून पेशव्यांनी त्यांना पत्र पाठवून नाराजी व्यक्त केली. तसेच, इसवी सन १७७२–७३ साली हरबाजीराव धुळप यांच्याकडे परगणे चिकबलापूर (कर्नाटक) येथील सुभा असल्याचा उल्लेख कागदपत्रांतून सापडतो.

**आंबोळगड येथील बाग :**

धुळपांकडे आंबोळगड येथील पेठेत एक बाग होता. हा बाग मखत्याने दिला जात असे.

**धुळपांचे झेंडे :**

इसवी सन १७८२–८३ मधील नोंदीनुसार धुळपांची स्वतःची

खासगत निशाणे होती. ही निशाणे स्वारीवर जाताना नेली जात असत. बहुदा धुळप आणि त्यांच्या तुकडीतील सैन्य ओळखता यावे यासाठी ही निशाणे असावीत.

**वंशावळ :**

इतिहासकार गो. स. सरदेसाई यांच्या 'ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी' या पुस्तकात धुळप घराण्याची वंशावळ दिलेली आहे. यातील सिदोजीराव हे खेडजवळील घिवरे बंदरानजीक असलेल्या गांवशा बंदर येथे आले होते. त्यांच्या दोन पुत्रांपैकी एका पुत्रास म्हणजेच कृष्णाजीसही दोन पुत्र होते. त्या पुत्रांपैकी हरजीराव यांना चार पुत्र झाले ते म्हणजे कृष्णाजीराव, रुद्राजीराव, जानराव आणि भगवंतराव. या पिढीपासूनच धुळप घराण्याचा मराठा आरमारात प्रवेश झाला. ही वंशावळ पुढीलप्रमाणे ·

***



प्रकरण २ :

# आरमार विजयदुर्ग

आरमार म्हटलं की, वेगवेगळ्या प्रकारची छोटी–मोठी जहाजे, गुराबे, गलबते इत्यादी डोळ्यांसमोर उभी राहतात; परंतु आरमार तैनात असते त्या ठिकाणी कशा प्रकारे कामकाज चालत असे, याचा आढावा घेणंही तितकेच आवश्यक आहे. पुणे पुरालेखागारातील विजयदुर्गच्या मोडी कागदपत्रांमधून जी माहिती मिळाली त्यावरून हे कामकाज कसे चालत असे, याची माहिती या प्रकरणात घेऊयात.

**बंदर :** आरमार ज्या ठिकाणी तैनात असते ते ठिकाण म्हणजे बंदर. विजयदुर्ग बंदर हे मराठा आरमाराचे केंद्रस्थान पूर्वीपासूनच होते. मुख्यतः इथूनच आरमाराचे दैनंदिन कामकाज चालविले जात असे. या ठिकाणी जहाजांची ये–जा अव्याहतपणे चालू असे. इथे चालणाऱ्या कामकाजाचा हिशेब दर्या सदर म्हणजेच बंदरावर असलेल्या कचेरीत ठेवला जात असे. याशिवाय विजयदुर्ग बंदरात धान्य साठविण्याची कोठी, गवताच्या गंजीची कोठी, जामदारखाना, लोहारशाळा, दारूखाना, चिंच बंदर, चौकी गडगा इत्यादी ठिकाणी चौक्या व पहारे असल्याचे उल्लेख येतात.

**मालाची आयात–निर्यात :**

विजयदुर्ग बंदरातून सरकारी गलबतांवरून आणि व्यापारी गलबतांवरून मालाची ने–आण केली जात असे. सरकारी कामासाठी सरकारी गलबते आणि त्याव्यतिरिक्त गरज पडल्यास खासगी गलबते किंवा डंग्या या भाड्याने घेतल्या जात असत. अशा भाड्याने घेतलेल्या गलबतांना 'नोरी गलबत' किंवा 'नोरी डंगी' असे म्हणत असत. या गलबतांवरून तांदूळ, नागली, मीठ, वेगवेगळ्या प्रकारची धान्ये, तेल, फळे इत्यादी अनेक प्रकारच्या गोष्टींची आयात निर्यात चालत असे. यामध्ये बाहेरील देशांतून येणाऱ्या विविध प्रकारच्या मालाचाही समावेश असे. त्यात तोफा, बंदुकी व त्यांची दारू, शस्त्रास्त्रे, सुगंधी माल, काच, पितळ, तांबे इत्यादी धातूंच्या वस्तू, भांडी, विदेशी चित्रे अशा अनेक गोष्टी असत. इप्सितस्थळी गलबते पोहोचल्यावर त्यावरील माल उतरवताना बऱ्याच वेळेस रात्र झाली तरी मशालीच्या उजेडात त्यासंबंधीची कामे पूर्ण केली जात असत. जसे की स्वारीच्या गलबतावरील माल उतरवणे, गलबते धड्यावर घेणे, गलबते गोदीत

घालणे, गलबतांची दुरुस्ती, गलबतावरील लोकांचे पगार वाटप इत्यादी.

**जहाजे पाण्यात लोटणे आणि धड्यावर घेणे :**

गलबते किंवा गुराबे स्वारीवर जाताना ती धड्यावरून पाण्यात लोटणे आणि स्वारीवरून आल्यावर परत धड्यावर घेणे हे मोठे कष्टाचे काम बंदरांमध्ये नेहमी चालत असे. धडा म्हणजे जहाज किनाऱ्यावर ठेवण्याची आच्छादित जागा. हे काम गलबतावरील दर्यासारंग, तांडेल इत्यादी मंडळी करत असत. जहाजे पाण्यात लोटताना किंवा धड्यावर घेताना त्यांच्याभोवती मालदीवी किंवा आगरी काथ्याच्या दोरखंडाचा सापळा गुंडाळून ती पाण्यात लोटली किंवा धड्यावर घेतली जात असत. तसेच, चिलपांना साबण लावून त्यांचाही वापर केला जात असे. चिलप म्हणजे लाकडाचे ढलपे. गलबते किंवा गुराबे धड्यावर घेता किंवा पाण्यात लोटता लोकांना खूप मेहनत करावी लागत असे आणि बराच वेळ पाण्यात राहावे लागे. सबब, त्यांना श्रमपरिहार म्हणून आणि थंडीपासून बचाव व्हावा यासाठी तंबाखू, भांग, सरा दारू, माडी तसेच सरबतासाठी आमसूल व साखर दिली जात असे.

**अपघात :**

गलबते किंवा गुराबे धड्यावर लोटताना बऱ्याच वेळेस छोटे मोठे अपघात होत असत. जसे की लोकांना शारीरिक दुखापती होणे इत्यादी. असे अपघात होऊ लागले कि ते होऊ नयेत म्हणून विविध देवी-देवतांना नवस केले जात असत. उदाहरणादाखल इसवी सन १७६२ सालातील नोंद - गलबत समसेर वसईचे, पाण्यातून धड्यावर घेते समयी लोक दुखवावयास लागले. सबब श्रीरामेश्वर वास्तव्य गिरये यास साखर वाहावयाचा नवस केला. त्यामुळे गलबत सुखरूपपणे धड्यावर आले आणि लोक दुखावले गेले नाही.

**गोदी :**

स्वारीवर नसताना वेगवेगळ्या प्रकारची जहाजे, गुराबे, गलबते छावणीसाठी ठेवण्याचे आणि त्यांची दुरुस्ती करण्याचे ठिकाण म्हणजे गोदी. विजयदुर्ग बंदराची गोदी शेजारीच असलेल्या मौजे गिरये या गावात होती. आजही या गोदीचे अवशेष पाहता येतात. या गोदीच्या जवळ विहीर असल्याचा उल्लेख इसवी सन १७७४ च्या कागदपत्रांतून पाहायला मिळतो. तसेच, याच वर्षी गोदीवर पाल व गुराबे यांची अवजारे ठेवण्यासाठी नवी वखार बांधल्याचा उल्लेखही मिळतो.

**गोदीत चालणारी कामे :**

**१) जहाजांची दुरुस्ती :**

गलबते किंवा गुराबे स्वारीवरून परत आल्यानंतर गोदीत ठेवली

जात असत. तिथे त्यांची दुरुस्ती आणि देखरेख केली जात असे. तसेच पर्जन्यकाळात पावसाने जहाजांचे नुकसान होऊ नये यासाठी नारळाच्या झावळ्या इत्यादींची छावणी जहाजांवर उभारली जात असे.

**२) मुसी राखणे (इसवी सन १७६२) :**

गोदीवर नेहमी चालणाऱ्या कामांव्यतिरिक्त पावसाळ्याचे चार महिने रात्रंदिवस चालणारे महत्त्वाचे काम म्हणजे मुसी राखणे. मुसी किंवा मूस म्हणजे गोदीतील साठलेले पाणी बाहेर काढण्यासाठी गोदीच्या तळाशी पाणी बाहेर जाण्यासाठी तयार केलेली वाट. पर्जन्यकाळात सारखेच पाणी साठत असे. ते पाणी बाहेर काढण्यासाठी पर्जन्याचे चार महिने, ८ दर्यावर्दी रात्रंदिवस काम करत असत. पाणी मुसीतून व्यवस्थित बाहेर जात आहे किंवा नाही, हे पाहण्यासाठी दर्यावर्दींना वारंवार पाण्यात बुड्या माराव्या लागत असत. सारखेच पाण्यात राहावे लागत असल्याने त्यांना थंडी वाजत असे. सबब, उष्णतेसाठी त्यांना ओवा, मिरी, तंबाखू, लसूण, सरा दारू व माडी देण्याची तरतूद केली जात असे. याशिवाय गोदीत पावसामुळे साठलेला चिखल उपसण्याचे कामही या लोकांना करावे लागत असे. बंदरातून गोदीवर जाण्या-येण्यासाठी दर्यावर्दी लांग बोटीचा वापर करीत असत. शब्दकोशात 'लांग' या शब्दाचा अर्थ 'किनारा' असा दिलेला आहे. किनाऱ्यावरील छोट्या-मोठ्या कामांसाठी वापरली जाणारी ती लांग बोट, कदाचित असा अर्थ असावा. पावसाळ्यात दर्यावर्दींना लांगबोटीवरून जा ये करताना थंडी वाजू नये म्हणून ओढण्यासाठी तंबाखू दिली जात असे.

**दास्तान कोठी :**

आरमाराकडील धान्य साठविण्याची कोठी म्हणजे दास्तान कोठी.

**चौक्या :**

बंदराच्या विविध भागांत जसे की, गोदी, दप्तर, जामदारखाना, दारूखाना, धान्य कोठी, जिन्नस कोठी इत्यादी ठिकाणी चौक्या आणि पहारे ठेवले जात.

**अलंग खासबारदार :** खासबारदार यांच्या राहण्याच्या जागा.

आरमाराकडे कामाला असलेले लोक : १) आरमारचा सुभेदार २) सुभेदाराचे साहाय्यक सरदार ३) दर्यावर्दी - यामध्ये सारंग, तांडेल, पांजरी व शेरकरी (नोकरदार) ४) हशम ५) बाजे हशम ६) बरखंदाज (बंदूकधारी) ७) तोफखान्याकडील गोलंदाज इत्यादी. समुद्री स्वाऱ्यांवर हे सर्व लोक जात असत. याशिवाय गोदी व बंदरातील छोट्या मोठ्या कामकाजासाठी इतरही लोक आरमाराकडे असत. यामध्ये सुतार, लोहार, मजूरदार इत्यादींचा समावेश असे. याशिवाय

दालदी लोकांच्या होड्या आरमारावर पाणी भरण्यास ठेवलेल्या असत. दालदी म्हणजे समुद्रकिनारी राहणारे आणि आरमाराकडे कामाला असलेले लोक.

**आरमाराकडे लोकांची भरती :**

आरमाराकडे नवीन लोकांची भरती करताना त्या व्यक्तीची उपयुक्तता पाहिली जात असे. उदाहरणार्थ पुढील नोंद . इसू परायकर मलिक, वस्ती जैतापूर, कसबी, चांगला याकरिता चाकर ठेवावयास आणिला होता परंतु तो चाकर न राहे तेव्हा एक महिन्याचा करार करुन आरमारावर उत्तम कसबी म्हणोन स्वारीस पाठविला (इ.स.१७६१)

**पोस्त :**

आरमाराकडे छोटी मोठी कामे करताना लोकांना मेहनत जास्त पडली किंवा त्यांनी चांगले काम केले तर त्यांना पोस्त म्हणजे बक्षीस दिले जात असे. उदाहरणादाखल – १) बुधवार ११ जून १७७७ रोजी गलबते छबीन्यास (फेरी मारण्यास किंवा गस्तीस) रात्री रवाना केली. त्यावरील भरतीच्या लोकांनी मेहनत भारी केली. चार प्रहर जागरण झाले. सबब अंगाला लावण्यास ४८ नारळ (तेलासाठी) दिले २) इसवी सन १७७६–७७ : हरबाजीराव धुळप चोरांच्या बंदोबस्तास वावडी, बाल्या, वाघी इत्यादी गलबते घेऊन खाडीतून शेजवली येथे गेले. त्यावेळेस समुद्राला भरती असूनही दर्यावर्दी यांनी भारी मेहनत करून जलदीने पोहोचविले म्हणून त्यांना बक्षीस दिले. ३) सोमवार १८ जुलै १७६३ यादिवशी भगवंतराव धुळप यांच्या पथकातील कृष्णाजी सिरसेकर याने स्वारीवर असताना शत्रूच्या एका डंगीवर (होडीवर) चढून चांगली तलवारबाजी केली आणि डंग्या व चार गलबते धरून आणली. सबब त्याला साडेश्यांह्याशी रुपयाचे तिवट (वस्त्र) बक्षीस म्हणून दिले. ४) इसवी सन १७६८–६९ – अ) गुरुवार २ मार्च १७६९ रोजी विजयदुर्ग येथे मोठे वादळ झाले. वादळामुळे बंदरात उभ्या असलेल्या महादेव नावाच्या पालाचा (लढाऊ जहाजाचा) पावडा (नांगर) साखळी तुटल्याने समुद्रात बुडाला. तो काढण्यासाठी पाणबुडे यांनी समुद्रात उड्या मारल्या असता त्यांना अंगारकांच्या (आंग्रेंच्या) कारकिर्दीत बुडालेला नांगरही आढळला. दोन्ही नांगर पाणबुड्यांनी काढले सबब त्यांना १५ रुपये बक्षीस दिले. आ) गुराब व गलबते यांच्या टाक्या (पाण्याच्या) आतील अंगाने डांबरल्या सबब पोस्त दिले. इ) मौजे हातदे येथील जहाजे बनविण्याचा कारखाना होता. कारखान्यातून लाकडी सोटे खारेपाटण येथे आणताना लोकांना नदीतून यावे लागले सबब पोस्त दिले. ई) आरमार उपर स्वारीवर असताना मंगळवार ११ ऑक्टोबर १७६८

रोजी गलबत वेताळ बुडून दर्यागर्क झाले. परंतु गलबत रामबाणवरील गलबतकरी लोकांनी मर्दुकी करून गलबतात शिरलेले समुद्राचे पाणी उपसून गलबत वाचविले. सबब, तेथील लोकांना बक्षीस म्हणून गूळ वाटला. उ) शिमगा पौर्णिमेस आरमारकरी लोक शिमगा खेळले सबब पोस्त दिले.

वरील माहितीवरून आपल्याला सर्वसाधारण कल्पना येईल की, विजयदुर्ग येथे आरमाराचे दैनंदिन कामकाज कशा पद्धतीने चालत असे.

***

## गुराब



प्रकरण ३ :

## जहाजांचे प्रकार -

विजयदुर्ग आणि इतर बंदरांत तैनात असलेल्या मराठा आरमारातील पाल, गुराब, गलबते इत्यादी वेगवेगळ्या प्रकारच्या जहाजांची नावे काय होती याविषयीची इसवी सन १७६१-६२ सालातील यादी या प्रकरणात पाहूयात. त्यावरून पेशव्यांनी धुळप यांच्याकडे आरमाराची जबाबदारी दिल्यानंतर कोणत्या प्रकारची जहाजे मराठा आरमारात होती, याची माहिती मिळण्यास मदत होईल.

**गुराब :** गणेश, दत्तप्रसाद, आनंदी, साहेबासेर, सिवप्रसाद,

**गलबते :**

फतेलष्कर, मार्तंड, मनमुराद, हवावी, नरनाग, यशवंती, हिरकणी, शाहतीर, सजली, सराई, सूर्या, गरूड, दौलतराव, रघुनाथ, संभू, जारिजा, सवाई, सवाई बहिरी, सेऱ्या, यशवंतराव, समसेर, सुग्रीव, सवाई रघुनाथ, यशवंती, नवरतन, चांदणी, सला, सवाई सरदारी, गलबत वावडी ऊर्फ चाचेरी असेही एका गलबताचे नाव आढळून येते. हे गलबत चाच्यांकडून हस्तगत केले असावे.

**डंगी :**

हुसेनी, फतेरेहमानी, डंगी सैदी, डंगी याकुबी, अहमदी. इसवी सन १७७६-७७ च्या कागदातून एका डंगीचे नाव लहान बोबडा असेही आढळून येते.

**महागिऱ्या :** दौलती, सीताबराव

**जंजिरे रेवदंडा (इसवी सन १७५७-५८) :**

नरनाग, शिरजोर, गरूड, सीताबगड, शेरवा, असमान चपेटा, नागीन, गलबत रामबाण, गलबत दर्याबादल, गलबत सर्जा, गलबत वेताळ.

**रत्नागिरी :**

गलबत नारायण प्रसाद, गलबत, गलबत राजहंस,

**गलबतांची नावे खुर्द आणि बुद्रुक :** एखाद्या गावाच्या नावाप्रमाणे गलबतांची नावेही खुर्द आणि बुद्रुक ठेवल्याचे कागदपत्रांतून दिसून येते. रत्नागिरी येथे सीताबराव खुर्द (लहान),सीताबराव बुद्रुक (थोर) अशी दोन गलबते होती.

**जयगड :**

गलबत वेताळ, गलबत गवा, गलबत पारा.

| जहाजांचे प्रकार | अर्थ |
|---|---|
| पाल | मोठे लढाऊ जहाज |
| गुराब | मोठे लढाऊ गलबत किंवा जहाज |
| गलबत | मागील बाजूने पसरट व वाटोळे आणि पुढील बाजूस निमुळत्या आकाराचे पात्र. |
| डंगी | नाळीप्रमाणे मागचा भागही चिंचोळा असलेली होडी |
| महागिरी | मोठे मालवाहू गलबत |
| मचवा | होडी |
| तिरकती | तीन डोलकाठ्यांचे जहाज |
| दुघोसी | दोन शिडांचे |
| तराडे | मूळ शब्द तरांडे म्हणजे लढाऊ गलबताचा एक प्रकार |
| होडी | मालवाहू नौका |
| खटारा | मालवाहू जहाजाचा एक प्रकार |
| मंजी | गलबताचा एक प्रकार |
| लांगबोट | किनारा अथवा तळावरच्या बोटी |
| बरकीण | नौका |
| बतेल | थोड्या पाण्यात जाता येईल असे उथळ बुडाचे गलबत |
| हुलक्या | गलबताचा प्रकार |
| पगार | एक प्रकारची होडी |
| गाफील | गलबताचा एक प्रकार |
| मचूल | बहुदा मचवा |
| सिबाड | गलबताचा एक प्रकार |
| डाव | गलबत किंवा होडीचा एक प्रकार |
| ग्याली | गलबताचा प्रकार |
| सरई | जलद चालणारे जहाज |

***

# गलबत


परभान
गावी/अवजार
कप्पी
गावीची पारी
निशाण
डोलकाठी
अवजार
बोंब
लांजा
साबई
इसांग्या/हांजा/दोरडे
भुरडा
नाळी
भांडे
कुंभारु
मात जोड्या काथेरी
फाणस कंदे
पावडा
सुकाण
बोडद

प्रकरण ४ :

# आरमाराच्या स्वाऱ्या

पश्चिम किनाऱ्यावरील समुद्र हद्दीतून बेकौली म्हणजेच विनापरवाना जाणारी व्यापारी जहाजे, गलबते यांचा शोध घेऊन ती जहाजे आणि त्यावरील माल जप्त करून आरमाराच्या खर्चाची तरतूद करणे हा आरमाराच्या स्वाऱ्यांचा प्रमुख उद्देश असे. हे काम करत असताना शत्रूंच्या आरमाराशी बऱ्याच वेळेस गाठ पडत असे आणि लढाई होत असे. या लढाईत शत्रूचा पराभव करून त्यांच्या आरमारातील जहाजेही पकडून आणली जात असत. काही वेळेस शत्रूचे आरमारही मराठा आरमारातील जहाजे पकडत असे. मराठा आरमाराच्या लढाया प्रामुख्याने वलंदेज म्हणजे डच, फरासीस म्हणजे फ्रेंच, फिरंगी गोवेकर म्हणजे पोर्तुगीज, शामल म्हणजे जंजिरेकर सिद्दी आणि इंग्रज इत्यादींच्या आरमाराशी होत असत. याशिवाय समुद्री चाच्यांशीसुद्धा बऱ्याच वेळा संघर्ष होत असे.

**स्वारीवर जाणारे लोक :**

स्वारीचे नेतृत्व बहुतेक वेळा सुभेदार स्वतःच करीत असत. काही वेळेस आरमारातील इतर सरदार नेतृत्व करत असत. याशिवाय स्वारीमध्ये दर्यासारंग, तांडेल, हशम, बाजे हशम, तोफा चालविणारे गोलंदाज, बरखंदाज म्हणजेच बंदूकधारी सैनिक इत्यादी लोक असत

**स्वारीतून मिळणारे उत्पन्न :**

आरमार स्वारीस गेल्यावर जी बेकौली जहाजे किंवा शत्रूच्या आरमाराच्या ताफ्यातील जहाजे धरून आणली जात त्यावरील माल जप्त करून त्याची विक्री केली जात असे. यामध्ये धातूची भांडी किंवा वस्तू, हत्यारे, सुगंधी माल, पोथ्या, फिरंगी चित्रे, मातीच्या वस्तू, लाकडी वस्तू, विविध प्रकारची वस्त्रे, सोने, चांदी, पितळ तांबे इत्यादी वस्तू असत. तसेच वेगवेगळ्या प्रकाराचे धान्यही असे. या वस्तू आणि पकडून आणलेल्या जहाजांपैकी निरुपयोगी जहाजांची विक्री करून ती रक्कम सरकारात जमा केली जात असे. बुधवार १६ सप्टेंबर १७६१ ते शुक्रवार ४ जून १७६२ या ८ महिन्यांत रुद्राजीराव धुळप यांच्या नेतृत्वाखाली ज्या स्वाऱ्या झाल्या त्यातून मिळालेल्या उत्पन्नाचा तपशील पुढीलप्रमाणे – ६ डंग्या मस्कती, शियारेपुत्री नावाचे १ पोर्तुगीजांचे जहाज त्याचा फयल मनोद नावाचा कपतान

साकीन बंदर मंदीले येथील होता, १ कुंजरा? मलबारी, उदे कामत नावाच्या इसमाच्या ३ मंज्या कामोरी (कामगार घेऊन जाणाऱ्या) आणि मिठाच्या, ज्या इस्फरास नावाचा मनुष्य घेऊन जात होता, १ हवावी नावाचे गलबत जे सावंतांच्या आरमारातील होते परंतु ते सिद्दीने पाडाव करून नेले होते मराठा आरमाराने ते सोडवून आणले, ३ मचवे पैकी १ लहान २ मोठे त्यातील एक वलंदेजी जहाजाचा मचवा होता. अशी आणि इतर मिळून एकूण १७ जहाजे आणि त्यावरील वस्तू मिळाल्या.

बहुतेक वेळा आरमार पावसाळा संपल्यावर म्हणजेच दसऱ्याच्या दिवशी स्वारीस निघत असे. याविषयीच्या अनेक नोंदी मोडी कागदपत्रांतून आढळून आल्या. त्याचाच थोडक्यात आढावा घेऊयात.

**स्वारीचा मुहूर्त :**

आरमार स्वारीसाठी निघताना मुहूर्त काढून निघत असे. श्रीगणपती पूजन, स्थानिक देवीदेवतांचे पूजन करून मुहूर्त, घटिका वगैरे पाहून आरमार स्वारीस निघत असे. यावेळेस स्थानिक देवी-देवतांना नारळ, मिठाई अर्पण केली जात असे. तसेच आजूबाजूच्या गावातील एखाद्या ब्राह्मणाकडून मुहूर्त काढून स्वारीवर जाणाऱ्या जहाजांची पूजा केली जात असे. गलबताच्या पठाणाखाली म्हणजेच पुढच्या बाजूला तळाशी नारळ ठेवला जात असे आणि मगच गलबत किंवा गुराब धड्यावरून पाण्यात लोटले जात असे.

**दसऱ्याला जहाजांचे ओटीभरण :** दसऱ्याला जहाजाचा धेडा काढत्या वेळेस प्रत्येक जहाजाची ओटी भरून दक्षिणा ठेवण्याचा शिरस्ता होता. धेडा म्हणजे धडा, म्हणजेच गलबते किनाऱ्यावर ठेवण्याची जागा. धेडा काढणे याचा अर्थ बहुदा गलबते धड्यावरून जेव्हा पाण्यात लोटली जात तेव्हा धड्याजवळ दक्षिणा वगैरे ठेवणे असा असावा. इसवी सन १७६२ च्या नोंदी नुसार - गुराबाचा धेडा काढण्याचा पूर्वीचा शिरस्ता होता सबब ५ रुपये धेड्याजवळ ठेविले. तसेच साडी चोळी, १ रुपया दक्षिणा आणि बकरेहि दिले. याशिवाय श्री गंगेस, श्री चवंडेश्वरी, चवाट्यास, गणेशपूजेस, श्रीवाळेश्वरास, आणि संभाजी आंग्रे यांच्या समाधीसमोर नारळ ठेवले जात.

**जहाजावरील बागायत :**

स्वारीसाठी जहाजे पाण्यात लोटताना जहाजांवर बागायत लावण्याचा शिरस्ता होता. बागायत म्हणजे ऊस, नारळाच्या झावळ्या इत्यादी लावून जहाजे सजवली जात असत आणि मिठाई वाटली जात असे. उदाहरणादाखल - गुराब रामप्रसाद नवीन सुमुहूर्तावर लोटिता गुराबावर बागायेत लावावयाचा शिरस्ता आहे सबब खरीदी

करून उत्त आणिले (इसवी सन १७६१)

**देवस्की :**

आरमार स्वारीवर असताना तत्कालीन समजुतीप्रमाणे भूत, पिशाच्च इत्यादींचा उपद्रव होऊ नये म्हणून गलबते आणि गुराब यांच्यावरून काही गोष्टी ओवाळून टाकल्या जात असत. उदाहरणादाखल इसवी सन १७६५–६६ ची नोंद – आरमार स्वारीस जाते समयी पिशाच उपद्रवामुळे तोडमोड होते सबब ओवाळून काढावयासाठी तेल, हळद, सुपारी, गुळ, चिथडे इत्यादीसाठी खर्च झाला. याशिवाय कोंबड्या, बकरे इत्यादी गोष्टीही ओवाळून टाकल्याच्या नोंदी सापडतात. या विषयीची विस्तृत माहिती नवस आणि देवस्की या प्रकरणात दिली आहे.

**स्वारीवरील तोफांचे बार :**

आरमार स्वारीवर जाऊन पुन्हा बंदरात येईतोपर्यंत इशारतीसाठी तोफांचे बार उडविले जात असत. हे बार कोणकोणत्या वेळेस आणि कोणत्या कारणांसाठी उडविले जात, ते पाहूयात. १) गुराब आणि गलबतांची डोलकाठी उभारताना बार उडविले जात. २) स्वारीसाठी जाणारी जहाजे धक्क्यावरून पाण्यात लोटताना तोफांचे बार उडविले जात असत. ३) स्वारीवर सुभेदार हाच प्रमुख म्हणून जात असे. काही वेळेस त्याचे इतर सहाय्यक सरदारही जात असत. स्वारीवर जाण्यासाठी सुभेदार किंवा सरदार यांनी गुराबावर पाऊल ठेवले की, तोफांचे बार उडविले जात असत. ४) बंदरातून समुद्रात शिरत असताना बंदरातील आणि आसपासच्या गावातील देवी–देवतांच्या, पिरांच्या नावाने बार उडविले जात असत. उदाहरणादाखल विजयदुर्ग बंदरातून आरमार बाहेर निघताना मौजे गिर्ये येथील श्रीरामेश्वर आणि बंदराजवळील पिराच्या नावे तोफांचे बार उडविले जात असत. याशिवाय आरमार ज्या बंदराच्या किंवा गावाच्या समुद्रकिनाऱ्यावरून जात असे त्या त्या ठिकाणी असलेल्या देवी–देवता, पीर इत्यादींना मान देण्यासाठी बार उडविले जात असत. ५) काही वेळेस इंग्रज, पोर्तुगीज इत्यादींच्या आरमाराशी समुद्रात गाठ पडली तर त्यावेळेस त्यांना राम राम करण्यासाठी तोफांचे ५ बार उडविले जात असत.

**खाण्या–पिण्याची तरतूद :**

या स्वाऱ्या जवळपास तीन–चार महिने चालत असत. स्वारीवर निघताना विजयदुर्ग येथून खाण्याच्या वस्तू आणि पिण्याचे पाणी लाकडी पिंपांमध्ये भरून घेतले जात असे. तसेच गरज पडल्यास स्वारीच्या मार्गावरील बंदरांमधूनही खाण्या–पिण्याच्या वस्तूंची तरतूद केली जात असे.

**स्वाऱ्यांचे मार्ग :**

स्वारी उपर आणि स्वारी हेट अशा दोन प्रकारच्या स्वाऱ्या विजयदुर्गच्या कागदपत्रांतून आढळून येतात.

**स्वारी उपर :**

विजयदुर्गपासून वरच्या बाजूच्या किनाऱ्याने म्हणजेच उत्तर दिशेला केलेली स्वारी म्हणजे स्वारी उपर. ही स्वारी बहुतेक वेळा वसई बंदरापर्यंत होत असे. काही वेळेस अगदी सुरतपर्यंत गेल्याचे उल्लेखही सापडतात.

**स्वारी हेट :**

विजयदुर्गापासून खालच्या किनाऱ्याने म्हणजेच दक्षिण दिशेला कर्नाटक, कोचीपर्यंत केलेली स्वारी म्हणजे स्वारी हेट.

**स्वारी मावळण :**

स्वारी मावळण म्हणजे मावळतीच्या दिशेने म्हणजेच पश्चिम दिशेला खोल समुद्रात केलेली स्वारी. अशी स्वारी अगदी क्वचितच केल्याचे उल्लेख आढळतात.

विजयदुर्ग येथून सुरू होणाऱ्या या स्वाऱ्या वेगवेगळ्या बंदरांतून किंवा वेगवेगळ्या ठिकाणांच्या समुद्रावरून जात असत. स्वाऱ्यांच्या या समुद्री मार्गाविषयी अनेक तपशीलवार नोंदी आढळून येतात. त्यापैकी रुद्राजीराव धुळप यांनी केलेल्या स्वाऱ्या आणि जानराव धुळप यांनी केलेल्या काही स्वाऱ्यांचा तपशील आणि त्यावरून बनविलेले नकाशे पुढे दिले आहेत.

**राजश्री सुभेदार रुद्राजी धुळप (इसवी सन १७६२-६३) -**

**१) स्वारी उपर :** विजयदुर्ग – बारा विजयदुर्ग – बारा पूर्णगड - बारा रत्नागिरी – बारा वेळणेश्वर – बंदर सुवर्णदुर्ग – बारा केळशी - बारा हरेश्वर – बारा श्रीवर्धन – बारा राजपुरी – बारा चेउल – बारा मुंबई – बारा वसई – बंदर वसई

**२) स्वारी हेट :** विजयदुर्ग – बारा देवगड – बारा आचरे – बारा देवदुर्ग – बारा विजयदुर्ग श्रीरामेश्वराचे नावे – बंदर मजकूर

**३) स्वारी उपर :** विजयदुर्ग – बंदर रत्नागिरी – डंगी सापडली तेव्हा – डंगी घेऊन आले तेव्हा – पूर्णगडचे बंदरी – जयगडचे बंदरी – सुवर्णदुर्गाचे बंदरी – वसईचे बाऱ्यावर – बंदर वसई – राघोजी आंग्रे याचे आरमार भेटले तेव्हा रामराम – वसईचे बाऱ्यावर – विजयदुर्गचे बाऱ्यावर – बंदर मजकुरी

**४) स्वारी उपर :** बंदर मजकूर – पावसचे बंदर – बंदर रत्नागिरी – बंदर पालसेत – बंदर सुवर्णदुर्ग – थलचे बंदर – वेसाव्याचे बंदर – खांदेरी – वसईचे बाऱ्यावर – वसईचे बंदरी – वसईचे खाडीत

– बंदर आंबोलगड – बंदर पूर्णगड – बंदर जयगड – बारा केळशी

**स्वारी उपर जानराव धुळप (इसवी सन १७६३–६४) :**

या स्वारीत एकूण ३९ वेळा तोफांचे बार उडविले गेले त्याचा तपशील : सुरवातीला बंदरातून मुहूर्ताने पावडा (नांगर) घेता सुभेदार चढले त्यावेळेस श्रीरामेश्वराच्या नावाने १ बार – पूर्णगडच्या समुद्रावर १ बार – रत्नागिरीच्या समुद्रावर भवानीच्या नावाने १ बार – पुळ्याच्या गणपतीच्या नावाने १ बार – कराडेश्वराच्या नावाने १ बार. फिरून येते समयी – खांदेरीच्या समुद्रावर खांदेरीच्या वेताळाचे नावे १ बार – कुलाब्याच्या समुद्रावर १ बार – राजपुरीच्या बाऱ्यावर १ बार – हरेश्वरच्या समुद्रावर १ बार – सुवर्णदुर्गच्या बाऱ्यावर १ बार – दाभोळच्या समुद्रावर १ बार – श्री कराडेश्वराचे नावे १ बार – केळशी समुद्रावर १ बार – गणपतीपुळेच्या समुद्रावर १ बार – श्रीवेळणेश्वरच्या समुद्रावर १ बार – रत्नागिरी भवानीच्या नावाने १ बार – पुळे गणपतीच्या नावाने १ बार – गिरयेच्या श्रीरामेश्वराचे नावे १ बार – बंदरात येताना दोन्ही बोडदांच्या (जहाजांच्या दोन्ही बाजूंच्या) तोफांनी सरबती केली.

**स्वारी हेट जानराव धुळप (इसवी सन १७६२–६३) :**

यावर्षी जानराव धुळप हेट स्वारीस गेले होते. त्यावेळेस बंदरातून निघाल्यापासून परत येईपर्यंत एकंदर ११८ बार उडविले.

बंदरातून बाहेर जाताना ५ बार पैकी जानराव धुळप गुराबावर चढले त्यावेळेस २ आणि मुहुर्ताने नांगर वगैरे घेताना ३ – श्रीरामेश्वराचे नावे समुद्रात शिरल्यावर १ – देवगडच्या समुद्रावर दिरबा देवीच्या नावे १ – श्रीकुणकेश्वराचे नावे १ – आचरे बंदरात एकूण ८ बार, पैकी ५ बार जानराव बंदरात उतरून तेथील देवाच्या दर्शनास गेले तेव्हा, १ पीराच्या नावाने, २ बार पावडा (नांगर) घेते समयी, एकूण ८ बार – मालवणच्या समुद्रावर श्रीरामेश्वराच्या नावे १ बार, फिरंगी (पोर्तुगीज) आरमाराची गाठ पडली आणि कप्तानाची भेट झाली त्यावेळेस रामराम केला त्याचे ५ बार – गोव्याच्या समुद्रावर १ बार – मिठोरेच्या समुद्रावर १ बार श्रीवेताळाच्या नावे – अली राजा कनानूरकर (कन्नूरकर) याच्या आरमाराशी भेट झाली ते समयी रामराम केला त्याचे ५ बार – तीरकती तराडे (जहाज) कांगीचे समुद्रावर हस्तगत केले त्यावेळेस ५ बार – हेलमांडीचे समुद्रावर सैद भेटावयास आले त्यावेळेस १ बार – कलीकोटचे बाऱ्यावर इंग्रजी तराडे भेटले ते समयी रामरामचे ५ बार – मंगरूळच्या समुद्रावर ५ बार – सिरवेलेच्या समुद्रावर १ बार, मिठोरेचे वेताळाचे नावे २ – गोकर्णच्या समुद्रावर महाबळेश्वराचे नावे १ – कारवाडच्या

(कारवारच्या समुद्रावर १ – अकोलेच्या समुद्रावर १ – कलीकोटचे समुद्रावर फिरंगी यांच्या जहाजावरील सावकार भेटीस आले ते समयी १ बार – हेलमहर्दीच्या समुद्रावर बदर मजकूरचा कप्तान भेटीस आला ते समयी ५ बार, हलमांडवी बदरात जानराव धुळप बंदरात उतरले त्यावेळेस १० बार – रेडींच्या समुद्रावर १ बार – फिरून विजयदुर्गला परत येताना मालवणच्या समुद्रावर १ बार – आचरेच्या समुद्रावर २ बार – गजमाई देवीचे नावे १ बार – श्रीकुणकेश्वराचे नावे १ बार – श्री दिरबा देव अवसरी (आदेश) आली ते समयी १ बार – विजयदुर्गाचे देवाचे नाव १ बार – १८ बार बंदर मजकुरी सरबत्ती केली नांगर टाकला ते समयी.

याशिवाय २४ बार बंदरेबंदरी व दर्यात नांगर घेता उडविले त्याचा तपशील – पणजीचा समुद्र, कलबुर्गीचा समुद्र, कलीकोटचा समुद्र, आरगाडचा समुद्र, कागादेवीच्या समुद्रावर, मंथा, तालचीरी, धर्मा पाटाल, हेली, बाविसखाने, रामतली, कुमक, मंजेसर, जलकी पावना, बसनूर, भाटकुल्ले, बेसाडी, मिरज (कर्नाटक), आंकोले, मिवश्वर, जुवेगोवे, निवती, आचरे, देवगड इत्यादी.

या स्वाऱ्या पश्चिम किनाऱ्यावरील ज्या ज्या ठिकाणच्या बाऱ्यांवरून म्हणजे समुद्रावरून आणि बंदरातून जात असत, त्यापैकी काही ठिकाणची बंदरे आजही अस्तित्वात आहेत तर काही ठिकाणी आज बंदरे नाहीत. तसेच काही बंदरे किंवा ठिकाणांची स्थळनिश्चिती आज होत नाही. कदाचित काही ठिकाणांची नावे कालौघात बदलली असावीत किंवा ते ठिकाणच आज अस्तित्वात नसावे. वेगवेगळ्या सालातील कागदपत्रांमधून आरमार स्वारीसाठी ज्या ज्या ठिकाणावरून किंवा बंदरांवरून जात असे, त्याची एकत्रित यादी खालीलप्रमाणे –

अ – अंकोले बंदर (कर्नाटक), अर्नाळा बारा आ – आचरे बंदर, आंबोळगड बंदर, आरगाडे बंदर ? क – कराडेश्वर, कलबुर्गी बंदर, कलीकोट बंदर, कागादेवी बंदर, कारवार बंदर, कुणकेश्वर बारा, कुमक बंदर, कुलाबा बंदर, केळशी बारा, कोचरे बंदर, कांगी, कन्नानोर (कन्नूर) बंदर, कन्यापूरचा बारा ख – खांदेरी, खुजणीचे बंदर नजीक मिरज (कर्नाटक) ग – गजमाई देवीचा बारा, गणपती पुळे बारा, गांवशा बंदर, गोपाळगडचा बारा, गोकर्ण महाबळेश्वर बारा, गोवे बंदर. घ – घिवरे बंदर, च – चेऊल बंदर ज – जयगड बंदर, जालकी पावटा (कर्नाटक) ?, जुवेगोवे (बहुदा कुंभारजुवे नावाचे बेट गोव्यात आहे, ते असावे) त – तालचिरी बंदर (थलशेरी) थ – थलचे बंदर द – देवगड बारा, दाभोळ ध – धर्मा पाटले ? न – निवती (कोंकण) प – पणजी बंदर, पालसेत बंदर, पावस बंदर, पूर्णगड

बंदर **ब** – बईदखोल बंदर, बसनूर बंदर, बावीसखाने बंदर, बेनावर (कर्नाटक), बेसाडी बारा, बोरबोली बंदर, बोरे बंदर (बोरी बंदर) **भ** – भाटकुले (भटकळ), भीम बंदर नजीक अंजनवेल असा उल्लेख सन १७८३–८४ च्या कागदात येतो. **म** – मंगरूळ बंदर, मंजेसर बंदर, मालवण बंदर, मिरज (कर्नाटक), मिठोरे बारा (गोव्यानजीक), मुंबई बंदर **य** – यशवंतगड बंदर **र** – राजपुरी बंदर, रामतली, रेडी बारा, रत्नागिरी बंदर **व** – वरवडे बंदर रत्नागिरी, वसई बंदर, वेसावे बंदर, वेळणेश्वर बारा **श** – शंकर बंदर सुरत असा उल्लेख येतो. **श्री** – श्रीवर्धन बारा **स** – सुरत बंदर, साष्टी बंदर, सिरवेले बारा, सिवेश्वर (कर्नाटक), सुरत बंदर, सुवर्णदुर्ग बंदर, सौंदण बंदर (कर्नाटक) **ह** – हरेश्वर बारा, हुनावर बंदर, हेलमाडी किंवा हेलमांडवी बंदर.

**(टीप – भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील ज्या बंदरांचा आणि ठिकाणांचा उल्लेख मोडी कागदपत्रांतून येतो; त्यांपैकी ज्यांची स्थळनिश्चिती करता आली त्यांचा नकाशा पुस्तकाच्या शेवटी दिलेला आहे.)**

**इशारत :**

आरमार स्वारीवर असताना इशारत म्हणून तोफांचे बार उडविले जात असत आणि रात्रीची वेळ असेल तर चंद्रजोतींचा वापर केला जात असे. चंद्रजोती म्हणजे चंद्राच्या प्रकाशासारखा प्रकाश देणारा एक फटाका. ही इशारत कोणत्या प्रसंगी दिली जात असे, त्याचा तपशील – **रामरामचे बार :** ज्या वेळेस इंग्रज, पोर्तुगीज इत्यादींशी तह केलेला असे त्या काळात त्यांचे आरमार समोर आले तर एकमेकांना रामराम म्हणून दोन्ही बाजूंनी तोफांचे ५–५ बार उडविले जात असत. तह नसेल तेव्हा लढाई होत असे. **वादळ :** स्वारीवर असताना बऱ्याच वेळेस दर्यात वादळ पडत असे; अशा वेळेस परत फिरण्यासाठी किंवा चुकामूक होऊन नये यासाठी इशारतीचे बार उडवले जात. **नांगरवाडा :** एखाद्या बंदरात नांगरवाडा (नांगर टाकताना) करताना किंवा बंदराजवळून जाताना इशारतीचे बार उडविले जात असत. **बंदरातून इशारत :** काही वेळेस एखाद्या बंदरात त्या बंदरातील लोकांकडून इशारत दिली जात असे की बंदरात न येणे. **अपघात :** जहाज अपघातात बुडू लागले तर इशारत दिली जात असे. **शत्रूचे आरमार आणि बेकौली जहाजे :** शत्रूच्या आरमाराची गाठ पडली किंवा बेकौली जहाजे दिसली तर इशारत म्हणून दिवसा तोफांचे बार आणि रात्री चंद्रजोतींचा वापर केला जात असे. उदाहरणादाखल – **इसवी सन १७६७–६८** – १) गुराब रामप्रसाद वसईस जात असताना वेसाव्याच्या समुद्रावर बाहेरील बाजूस डोलीचे खुटावर? गुराब अडकली त्यावेळेस

मागे असणाऱ्या दुसऱ्या गुराबास इशारत केली त्यासाठी दोन चंद्रजोती वापरल्या. २) गुराब आनंदी वसईस भात आणावयास जाता कोरली बंदरास गुराब मजकूर रात्री खराबेयावर (बहुदा समुद्रातील खडकावर) लागली ते समयी गलबतांचे लोक आणून गुराब तरती केली. तेव्हा उजेडासाठी ५ चंद्रजोती वापरल्या. **इसवी सन १७६७-६८ - १)** हैदर अली सोबत मराठा आरमाराची मंगरूळच्या समुद्रावर रात्रीच्या वेळेस लढाई झाली त्यावेळेस उजेडासाठी कंदवात (कंदील) आणि ९ चंद्रजोती वापरल्या. या लढाईत गुराब गणेशप्रसाद आणि गुराब साहेबासदर व गलबत नरनाग ही जहाजे होती. २) खांदेरी बाहेर फिरंगी (पोर्तुगीज) यांच्या काफल्याची रात्रसमयी गाठ पडोन लढाई झाली तेव्हा आणि कलीकोट बंदरात सैदी तराड्याची अडावणी केली त्यावेळेस उजेडासाठी व इशारतीबद्दल एकूण १७ चंद्रजोती वापरल्या. **३) वलावा** - रेवदंड्याचे बंदरातून सावकारी गलबते घेऊन वलावा बाहेर निघाला तेव्हा समुद्रावर चाच्यांची गलबते बाहेर दिसावयास लागली. सावकरी गलबते निघोन गेली; परंतु वलावा पुढे जाऊ लागला. ते समयी वलाव्यास इशारतीबद्दल २ बार उडविले. (वलावा विषयी पुढे एका प्रकरणात विस्तृत माहिती दिली आहे.) **इसवी सन १७६१-६२ :- १)** डंगी फतेरेहमानी रेवदंड्यापाशी बुडू लागली तेव्हा इशारत म्हणून बार उडविले. २) डंगी कुबी अंजनवेलीच्या बंदरावर सुकाणू मोडल्याने बुडायला लागली तेव्हा बार उडविले.

**आरमार स्वारीवरून बंदरात परतल्यावर (इसवी सन १७६१-६२):**

१) जहाजे स्वारीवरून परत आली की त्यावरील लोकांची झाडाझडती घेतली जात असे. २) त्यानंतर गुराबे किंवा गलबते धड्यावर घेतली जात असत. याप्रसंगी खूप मेहनत घ्यावी लागत असे. हे काम जहाजावरील खलाशी, दर्यावर्दी करीत असत. उदाहरणार्थ, गुराब दत्तप्रसाद धड्यावर घेते समयी खूप कष्ट मेहनत पडली. सबब, बक्षीस म्हणून सरबतासाठी साखर दिली. तसेच, जहाजे धड्यावर घेताना बराच वेळ पाण्यात राहावे लागत असल्यामुळे थंडी वाजत असे सबब त्यांना ओढण्यासाठी तंबाखू, भांग, सरा दारू, माडी इत्यादी गोष्टी दिल्या जात असत. ३) आरमार स्वारीवरून परत आल्यावर स्वारी सुखरूप झाली म्हणून देवस्कीची जत्रा केली जात असे.

***


स्वारी उपर
रुद्राजी धुळप
इ. स. १७६२-६३
वसई
मुंबई
चेऊल
राजापुरी
श्रीवर्धन
हरेश्वर
केळशी
सुवर्णदुर्ग
वेळणेश्वर
रत्नागिरी
पूर्णगड
विजयदुर्ग
अ र बी स मु द्र
उ.


स्वारी उपर
जानराव धुळप
इ. स. १७६३-६४
मुंबई
खांदेरी
कुलाबा
राजापुरी
हरेश्वर
केळशी
सुवर्णदुर्ग
दाभोळ
वेळणेश्वर
कराडेश्वर
गणपतीपुळे
रत्नागिरी
पूर्णगड
विजयदुर्ग
उ.

प्रकरण ५ :

# धुळपांच्या पराक्रमाचा समुद्रावरील धुरळा

मराठ्यांचे आरमार स्वारीस गेल्यानंतर बऱ्याच वेळेस इतर आरमारांशी जसे की, डच, पोर्तुगीज, इंग्रज, शामल आणि समुद्री चाचे यांच्याशी गाठ पडत असे आणि समुद्रावर छोट्या-मोठ्या लढाया होत असत. रुद्राजीराव धुळप आणि त्यांच्या कुटुंबातील इतर सदस्यांनी इसवी सन १७६० पासून पुढील काळात समुद्री लढायांमध्ये जो पराक्रम दाखविला आहे, त्याविषयीच्या नोंदी वाचून अक्षरशः थक्क व्हायला होते! धुळपांचा पराक्रम पाहून त्यांना 'दर्याधुरंधर धुळप' असेच संबोधणे जास्त योग्य आहे. समुद्रावरील या लढाया कशा पद्धतीने झाल्या, किती दारूगोळा वापरला गेला, शत्रूच्या आरमाराचे किंवा आपल्या आरमाराचे किती नुकसान झाले याच्याविषयी अत्यंत विस्तृत स्वरूपातील नोंदी मोडी कागदपत्रांतून पाहायला मिळतात. त्यावरच आधारित हे प्रकरण आहे.

**दर्याधुरंधर धुळपांच्या पराक्रमाचा धुरळा :**

धुळप घराण्यातील रुद्राजीराव धुळप, जानराव धुळप, कृष्णाजीराव धुळप, भगवंतराव धुळप, आनंदराव धुळप, हरबाजीराव धुळप, आपाजी धुळप, दौलतराव धुळप आणि बाबुराव धुळप या धुरंधरांनी ज्या पद्धतीने मराठा आरमार सांभाळले, ते खूपच कौतुकास्पद आहे. रुद्राजीराव धुळप हे कान्होजी आंग्रे यांच्या कारकिर्दीपासूनच मराठा आरमारात कार्यरत असल्याने त्यांच्याच तालमीत तयार झाले होते. त्यामुळे आरमार आणि त्याच्याशी संबंधित सर्वच गोष्टींची खडान्खडा माहिती असणे हे ओघाने आलेच, किंबहुना धुळपांनी केलेल्या स्वाऱ्या आणि त्यांनी ज्या पद्धतीने आरमाराचा कारभार चालविला त्यावरून आंग्रे यांच्या काळात मराठा आरमाराचे कामकाज काय पद्धतीने चालत असावे, आरमाराच्या स्वाऱ्या आणि लढाया कशा पद्धतीने होत असतील याची विस्तृत कल्पना यायला निश्चितच मदत होईल. धुळपांनी अनेक समुद्री लढाया करून समुद्रावर आपल्या पराक्रमाचा अक्षरशः धुरळा उडविला, त्यातील महत्त्वाच्या लढायांचा तपशील खालीलप्रमाणे :

**रुद्राजीराव धुळप, स्वारी हेट (इसवी सन १७६१-६२) :**

रुद्राजीराव धुळप यांच्या नेतृत्वात आरमार हेट स्वारीस म्हणजेच

विजयदुर्गच्या खालील बाजूच्या किनाऱ्याने दक्षिण दिशेला स्वारीस गेले असता ज्या लढाया झाल्या त्याचा तपशील.

**१) वलंदेजांचा दारुण पराभव :**

मराठा आरमाराची वलंदेजी तराड्याशी म्हणजेच डच जहाजाशी मालवणच्या बंदरात गाठ पडली. ही लढाई मालवणच्या बंदरात चालू झाली ती समुद्रावरून गोव्याच्या बंदरात जाईपर्यंत चालू होती. कागदपत्रांतून अहद मालवण तहद गोवे मारामार केली असा उल्लेख येतो. या लढाईत मराठा आरमाराच्या एकूण ५ गुराबा आणि १७ गलबते होती. त्यांची नावे पुढीलप्रमाणे . गुराबा – गणेशप्रसाद, शिवप्रसाद, दत्तप्रसाद, आनंदी, साहेबासदर. गलबते – मार्तंड, शाहतीर, नरनाग, सेरवा, यशवंतराव, संभू, फतेलष्कर, समशेर (वसईपैकी), सवाई रघुनाथ, यशवंती, चांदणी, सला, सवाई सरदारी, खंडेराव, दौलती, हिरकणी, हवावी. या लढाईच्या तपशिलाचा मूळ मोडी कागद परिशिष्टमध्ये पहावा.

२) फिरंगी (पोर्तुगीज) जहाजाची कलीकोटच्या बाऱ्यावर (समुद्रावर) गाठ पडली त्याजवर मारगिरी केली. ३) कोचीच्या समुद्रावर फिरंगी तराड्याची गाठ पडली त्याजवर मारगिरी केली. ४) मंगरोलचे बाऱ्यावर बेकौली डंगीची गाठ पडली त्याजवर मारगिरी केली. ५) मिठोरेच्या बाऱ्यावर फिरंगी यांची गाठ पडली.६) गोव्याचे बाऱ्यावर फिरग्यांची गाठ पडली ७) कलीकोट येथील नस्तावर (समुद्रावर) चीनी तराड्याची (जहाजाची) गाठ पडली. हटकले असता काही उत्तर दिले नाही सबब मारामार केली. ८) कनानूरचे (कन्नूर) बाऱ्यावर (समुद्रावर) इंग्रजी तराड्याची गाठ पडली त्याजवर मारामारी केली ९) बोरेबोलीचे समुद्रावर फिरंगी तराड्याची गाठ पडली १०) बसनूरचे बाऱ्यावर सावकारी डंगीची गाठ पडली ११) कलीकोटच्या बाऱ्यावर फिरंगी काफल्यातून मंजी व डंगी धरून आणिली. १२) कारवारच्या समुद्रावर सावकारी डंगीची गाठ पडली त्यावर मारगिरी केली. १३) हुन्नावरचे बाऱ्यावर बेकौली सावकारी गलबते दिसली त्यावर मारगिरी केली. १४) गोव्याच्या लढाईत किल्ल्यातून येऊन फिरंग्यांनी गलबतावर तोफेचे गोळे टाकून पळाले. सबब तोफांचे बार किल्ल्यावर टाकले.

**भगवंतराव धुळप (इसवी सन १७६१-६२) :**

याच वर्षी भगवंतराव धुळप यांनी उपर स्वारी म्हणजेच विजयदुर्गच्या वरील किनाऱ्याने उत्तर दिशेला स्वारी केली त्याचा तपशील –

१) अरनाळे येथील बंदरावर फिरंग्यांची गाठ पडली त्यांच्यावर मारगिरी केली. २) वसईच्या बाऱ्यावर फिरंगी काफल्याची गाठ

पडली त्यावर मारगिरी केली ३) रेवदंड्याचे बाऱ्यावर चाच्यांची गाठ पडली त्यावर मारगिरी केली. इसवी सन १७६१–६२ सालात मराठा आरमाराने ज्या समुद्री लढाया केल्या त्यासाठी खर्च झालेला एकूण दारूगोळा :– तोफगोळे – १६८४, बंदुकीच्या गोळ्या – १०,६५४, जंबूरी गोळे – ४४, दांडीचे गोळे – ५, दारू – पावणे बावीस खंडी, १० मण आणि साधारण सवा नऊ पायली.

**शामलाकडून गलबत सोडवून आणले :**

शामल म्हणजे सिद्दीचे आरमार सावंतांच्या आरमारातील हवावी नावाचे गलबत रेमूचे? समुद्रावरून पकडून घेऊन जात असताना मराठा आरमाराची गाठ पडली आणि हवावी गलबत सोडवून विजयदुर्ग इथे आणले. हे गलबत पुढे अनेक वर्षे मराठा आरमारात तैनात होते.

**इसवी सन १७६२–६३ : भगवंतराव धुळप :**

१) स्वारी हेट – बईदखोल येथून कापसाचे बेकौली तराडे धरून आणिले २) स्वारी उपर – अर्नाळ्याच्या नस्तावर (समुद्रावर) फिरंगी आरमाराची गाठ पडली, त्यातून नारळाच्या मंज्या (गलबते) धरून आणल्या त्या वेळेस लढाई झाली.

**कृष्णाजी धुळप :**

१) स्वारी हेट – अ) आफरादी (एकटे) तराड्याची गाठ पडली त्यावर तोफगोळे व गोळ्या घालून रेजगिरी (भडीमार) केली. आ) फिरंग्याची तराडी मंगलूरचे समुद्रावर नजरेस पडली त्यांच्यासोबत लढाई झाली. इ) गोव्याच्या समुद्रावर फिरंगी काफल्यावर मारगिरी केली. ई) कलीकोटच्या समुद्रावर तुंग मारी तराड्यांसोबत लढाई झाली. तुंग मारी तराडी म्हणजे जहाजांचा समूह किंवा टोळी.

**टोपीकरांशी संघर्ष :**

आरमार स्वारीस असता दर्यात टोपीवाले (टोपीकर इंग्रज) यांच्या बतेले, डावा व डंग्या वगैरे तराड्यांची गाठ पडोन लढाई झाली ते समयी त्यांच्यावर मारगिरी केली.

यावर्षी स्वारीसाठी वापरलेली एकूण गुराबे ७, बतेल १ आणि १९ गलबते होती. एकूण दारू साडेसोळा खंडी, सवा मण, साडे आठ शेर, एकूण तोफगोळे १३३८, एकूण जंबुरी गोळे १०२, गोळे २ दांडीचे गोळे ३, गोळे गर्भछाटी १८, गोळ्या बंदुकीच्या १४१९९, दारूच्या थैल्या १४६६.

**इसवी सन १७६३–६४ : जानराव धुळप –**

**१) शहाअलीच्या घरावर आणि वखारीवर हल्ला :**

या वर्षी आरमार शहाअलीचे घर व वखार मारावयास गेले; परंतु गनिमानेही जोरदार मारा केला सबब माघार घ्यावी लागली. हा शहा

अली म्हणजे बहुदा हैदर अली असावा. कारण, या वर्षी थोरले माधवराव पेशवे यांच्या आज्ञेवरून जानराव धुळप यांच्या नेतृत्वात मराठा आरमाराने हैदरच्या ताब्यात असलेल्या बिदनूर राज्याच्या पश्चिम किनाऱ्यावरील हुनावर बंदरावर स्वारी केली होती. या बंदरात हैदर अलीची वखार आणि आरमार होते. २) उपर स्वारीस असताना फिरंगी (पोर्तुगीज) यांच्या काफल्यातून बाबूजी नाईक वैद्य याची डंगी धरून आणली. ३) मालवण येथे फिरंगी आरमाराचा काफला आला होता. त्यापैकी मालवणावर तराडी आली होती त्यात सिलेपोस (जहाजाचा प्रकार) होती त्यासोबत मोठी लढाई झाली. ४) स्वारी हेट – पणजीच्या समुद्रावर बेकौली सावकारी डंगीची गाठ पडली. तिच्यावर मारगिरी केली. डंगी पळून जाऊ लागली पण ती खडकावर आपटून फुटली. यावेळेस १००० बंदुकीच्या गोळ्या आणि १०० तोफगोळे वापरले. ५) उपर स्वारीस असताना मालवणकरी यांचे आरमार धरून आणले. ६) स्वारी हेट – सावकारी हुलक्या व मंज्या धरून आणल्या.

**भगवंतराव धुळप स्वारी हेट :**

१) सावकारी डंगी पणजीचे नस्तावरून (समुद्रावरून) मारत मारत समुद्रात नेली ती दर्यागर्क झाली. २) घोडे व उंट वाहून नेणारी मंजी पकडली. ३) सैदी ? तराडे हेलमांडवीचे नस्तावर लढाई भारी होऊन धरून आणिले.

**सरदार कृष्णाजी नाईक जैतापुरकर :**

उपर स्वारीवर असताना चाच्यांशी गाठ पडली. मराठा आरमाराने त्यांचा पाठलाग करत त्यांच्यावर रेजगिरी केली. यावेळेस गर्भछाटी गोळे व साधे गोळे मिळून २० गोळे टाकले व त्यांना पळवून लावले.

**शहाअलीची (बहुदा हैदर अली) वखार लुटली –**

शहाअलीची वखार यावर्षी मराठा आरमाराने लुटली त्यावेळेस श्रमपरिहारासाठी आमसूल सरबत दिले.(गुरुवार १० नोव्हेंबर १७६३)

**पोर्तुगीजांची मंजी पकडली :**

वावडी गलबतावरील शिपाई व दर्यावर्दी यांनी फिरंगी (पोर्तुगीज) जहाजांची अडावणी करून मंजी धरून आणली सबब बक्षीस दिले. (गुरुवार,१० नोव्हेंबर १७६३)

**श्रीचवंडेश्वरी नवसास पावली :**

मौजे गिरये येथील श्रीचवंडेश्वरी देवीस स्वारीस जाते समयी नवस केला कि स्वारी फते झाली तर देवालयाचा जीर्णोद्धार करू. त्याप्रमाणे स्वारी फते होऊन बंदरात आली. सबब देवालयाचा जीर्णोद्धार केला. (रविवार ८ एप्रिल १७६४)

**सुरती जहाज पकडले आणि सोडून दिले :**

सुरत बंदरातील सावकार मुलाना फकरुद्दीन याचे फतेबक्ष नावाचे जहाज बईदखोल बंदर येथे छावणीस होते. ते इसवी सन १७६२–६३ सालात सरकारच्या आरमाराने जाऊन धरून आणले. परंतु जहाजास वसईहून सरकारी कौल दिलेला होता. सावकाराने पेशव्यांकडे जाऊन विनंती केली त्यावरून माल व जहाज सावकारास परत देण्याविषयी पेशव्यांनी आज्ञा केली. परंतु जहाजावरील माल विकला असल्याकारणाने त्याची जी किंमत होती ती आणि जहाज सावकाराला देण्यात आले.

**कृष्णाजी सिरसेकरची तलवारबाजी :** कृष्णाजी सिरसेकर दिमत भगवंतराव धुळप याने एका डंग्यावरी चढोन तरवार चांगली मारिली आणि डंगी व चार गलबते धरून आणिली सबब बक्षीस म्हणून त्याला साडेश्याहांशी रुपयाचे तीवट वगैरे वस्त्रे दिली. (सोमवार, १८ जुलै १७६३)

**इसवी सन १७६४–६५ :** कर्नाटकात मराठ्यांचा धुमाकूळ – यावर्षी कर्नाटक प्रांतातातील सिदीगड व सिवेश्वरगड येथे जाऊन मराठा आरमाराने लढाई केली. तसेच आवरसे गाव आणि भारकुल शहरावर हल्ला केला आणि तळग्याचा (बहुदा तोरगल किल्ला) मेढा (कोट) हस्तगत केला आणि जाळून टाकला. सिदीगडास लढाई करता करता रात्र झाली. सबब इशारतीसाठी २२ फुजीले (बहुदा चंद्रजोती) वापरले. याशिवाय बईदखोल येथे पिंगनिस फिरंगी याच्यासोबत लढाई झाली. आरमाराने गनीम पिटून लाविला. पोर्तुगीजांनी पकडून नेलेले जहाज सोडवून आणले – गोवेकर कप्तान वगैरे फिरंगी कोसीलदार (सल्लागार) यांनी इसवी सन १७६२–६३ मध्ये मराठा आरमारातील एक तुंग मारी तराडे (जहाजांच्या समूहातील एक जहाज) पाडाव केले व ते गोव्यास नेले होते. ते सोडवून आणण्यासाठी या वर्षी चिंतो नारायण, रायाजी पांडुरंग व बाबुराव फाटक यांना बोलणी करण्यास गोव्याला पाठविले. त्यावेळेस त्यांनी गोवेकर फिरंगी यांना वस्त्रे भेट म्हणून दिली त्याचा तपशील – विजरई राजा कप्तान यास ४०० रुपयांची वस्त्रे, सकट तार प्रधान याला २८ रुपयांची, अजुलदात ग्याल प्रतिनिधी ११५ रुपयांची, अंतुरकर यांना ७५ रुपयांची, मुतार फरास यास ९५ रुपयांची, मुगिग फरास याला १४ रुपयांची आणि साडेएक्काहात्तर रुपयाची वस्त्रे सदाशिव कामत दुभाषी याला दिली. (रविवार, ११ नोव्हेंबर १७६४) चिनी जहाज पकडले – जानराव धुळप हेट स्वारीवर असताना कन्यानोरच्या (बहुदा कन्नूर) बंदरातून चीनी तराडे धरून आणले. **चाच्यांवर तोफगोळे टाकले –**

गलबत गरुड उपर स्वारीस असताना त्यावरील अमद तांडेल याला कुंभारूच्या समुद्रावर चाच्यांची गलबते दिसली त्यावेळेस तोफांचे बार मारले. **कृष्णाजी जैतापूरकरचा पराक्रम** १) हेट स्वारीस असताना रात्रीच्या वेळेस समुद्रावरून सिबाडा मराठा जहाजांच्या जवळून जाऊ लागल्या. रात्रीची वेळ असल्याने कोण, कुठले याची विचारपूस न करता तोफगोळे डागले. २) हेट स्वारीत मंगरूळच्या समुदावर रात्रीच्या वेळेस डंग्या व मलबारी हुलक्या अंगावरून गेल्या त्यांच्यावर गलबत नवरतनवरून तोफांचे बार मारले. ३) गोपाळगडचे बाऱ्यावर (समुद्रावर) चाच्यांच्या आरमाराची गाठ पडली त्यावर गलबत सुग्रीववरून तोफांचे ४ बार मारले

**बहिरव गडावर स्वारी (इसवी सन १७६७–६८) :**

धुळपांनी केवळ समुद्रावरच नाही तर जमिनीवरील लढायाही लढल्या. खुश्कीच्या मार्गाने म्हणजेच जमिनीच्या मार्गाने भगवंतराव धुळप यांनी बहिरवगडावर स्वारी केल्याचा उल्लेख सापडतो. यावेळेस १ मण दारू आणि १००० गोळ्या खर्च झाल्या.

**डचांचे जहाज पकडले (इसवी सन १७६७–६८) :**

गोरेगावाहून गलबते वलावा घेऊन विजयदुर्गाकडे येत असताना रात्रीच्या वेळेस मिठोऱ्या हेट (मिठोऱ्या खालच्या समुद्र किनाऱ्याच्या दिशेने आलेल्या) वलंदेजी गाफील लढवई (डच लढाऊ जहाज) सुरतेस जात असताना जानराव धुळप यांच्या नेतृत्वातील मराठा आरमाराची गाठ पडली. त्यावेळेस लढाई करून जहाज पाडाव करून आणले. ही लढाई दीड दिवस चालली होती. त्यासाठी साडेचार खंडी साडेतीन मण साडेपाच पायली इतकी दारू आणि ४४४४ तोफगोळे खर्च झाले.

**इसवी सन १७६७–६८ :**

**हैदर अलीशी जानराव धुळपांचा संघर्ष** – जानराव धुळप हेट स्वारीवर असताना मंगरूळच्या समुद्रावर हैदरअलीच्या आरमाराची गाठ पडोन दोन प्रहर लढाई झाली. यावेळेस अडीच खंडी २ मण, ८ पायली दारू, १८८ तोफगोळे, गोळे डाचे? ५, गर्भछाटी ४, ५०१ गोळ्या इत्यादी खर्च झाला. २) **सैदी तराडे पकडले (जानराव धुळप)** : कलीकोटच्या बंदरातून सैदी तराडे ? लढाई करून धरून आणिले. ३) **पोर्तुगीजांशी लढाई (जानराव धुळप)** : खांदेरीच्या समुद्रावर फिरंग्याच्या काफल्याची गाठ पडोन दोन प्रहर लढाई झाली. ४) **चाच्यांनी गलबत पळवले** : विजयदुर्गचे कारकून गलबत हिरकणीवरून कागदपत्रे हुजुरांस (पुण्याला पेशव्यांना) दाखवावयास जात असताना पूर्णगडच्या समुद्रावर चाच्याची गाठ पडोन गलबत

धरून नेले. गलबतावरील कारकुनांना त्यांनी तिथेच सोडून दिले. **५) मस्कती डंगी पकडली :** मस्कती डंगी माल घेऊन राजापुरीच्या समुद्रावरून जात असता ती धरून आणली.

**इसवी सन १७६८–६९ : मराठ्यांचा मित्र अलीराजा :**

सन १७६७–६८ मध्ये संस्थान कन्नानूरच्या (कन्नूरच्या) अलीराजाची गुराब धरून आणली होती. परंतु पेशव्यांकडून पत्र आले की, अलीराजा हा मराठ्यांचा चांगला मित्र आहे. नेहमी सरकारच्या उपयोगास पडतो. सबब ती गुराब सोडून दिली. **मराठा आरमाराची दहशत :** कलीकोटचे बंदरावर असलेल्या इंग्रज जहाजांनी आपल्या जहाजावर फिरंग्यांचे (पोर्तुगीजांचे) निशाण लावले होते. यावेळेस मराठे आणि पोतगीजांचा तह असावा. पोर्तुगीज निशाण पाहिल्यावर मराठे हल्ला करणार नाही, असे इंग्रजांना वाटले; परंतु मराठा आरमारातील लोकांना शंका आल्याने त्यांनी इंग्रज जहाजांकडे आरमाराचा मोर्चा वळविला. ते पाहून इंग्रजांनी गुपचूपपणे स्वतः ची निशाणे लावली आणि निघून गेले. याविषयीची नोंद बोलकी आहे ती अशी की, ''सरकारचे आरमार भारी पाहून फिरोन आपली निशाणे लाविली व निघोन गेले.'' यावर्षी ५ गुराबे व १४ गलबते स्वारीवर गेली होती. **पोर्तुगीज लढवय्ये भारी :** कलीकोटचे बाऱ्यावर पोर्तुगीजांच्या सुमारे ५ जहाजांची गाठ पडली. त्यावर मारगिरी केली. या नोंदीत पोर्तुगीजांच्या लढवय्या वृत्तीचे कौतुकही केलेले आहे. ''गनीम लढवई भारी, त्याजवर मारगिरी केली.'' **फ्रेंचांनी जाळले स्वतःचेच जहाज :** या वर्षी आनंदराव धुळप आणि जानराव धुळप यांनी एकत्रित स्वारी करून फ्रेंचांच्या आरमाराविरुद्ध लढाई केली. पणजीच्या समुद्रावर फ्रेंच जहाजाची गाठ पडली त्यावर मोठी मारगिरी केली. फ्रेंच जहाज पळू लागले त्याचा पाठलाग करत असताना कलीकोटच्या बंदरात तराडे हेसरले (घसरले) आणि फुटले. फ्रेंच जहाजावरील लोकांनी आपले जहाज मराठ्यांच्या हातात पडू नये म्हणून जहाजास बत्ती दिली आणि पळून गेले. यावेळेस मराठ्यांच्या आरमारातील गुराब दत्तप्रसादवर ४७ बरखंदाज होते. **आरमाराची चुकामुक :** कलीकोटच्या समुद्रावर रात्रीच्या वेळेस आरमारातील काही जहाजांची चुकामूक झाली म्हणून इशारतीसाठी फुजील (बहुदा चंद्रजोती) वापरले. **बेकौली तराडे थोडक्यात निसटले :** मराठा आरमाराने पाळत ठेवलेले एक बेकौली जहाज कलीकोटच्या बंदरात नांगर टाकून होते. हे तराडे पकडण्यासाठी साहेबासदर गुराब आणि काही गलबते पाठविली होती. साहेबासदर गुराबावरील ३३ तरुण सैनिक गलबतावर चढविले आणि दारूगोळा देऊन कलीकोटचे

बंदरात रवाना केले. त्यांनी बेकौली तराड्यावर मोठी मारगिरी केली. तराडे ताब्यात घेण्यासाठी आपली गलबते जवळ जाण्यास निघाली तितक्यात समुद्रास ओहोटी लागली. पाणी कमी झाल्याने गलबते तराड्याजवळ जाऊ शकली नाहीत. त्याचवेळेस तराड्यावरून व कलीकोटच्या किल्ल्यावरून शत्रूने मारगिरी भारी केली. निरुपाय होऊन गलबते परत फिरवली. **सिव पाटले सरदार (स्वारी हेट)** – हेलमाडीचे समुद्रावरून सावंतांची गलबते, मंजी धरून नेत होते. सबब त्याजवर मारगिरी करून मंजी सोडविली. या नोंदीत सावंतांची गलबते कोण धरून नेत होते हे समजत नाही. बहुदा चाचे असावेत.

**राघोजी आंग्रेंच्या आरमारास मदत (इसवी सन १७७१–७२):**

राजश्री राघोजी आंग्रे सरखेल वजारतमहा यांची आरमारी गलबते जंजिरे विजयदुर्ग येथे आली असता त्यांना आवश्यक त्या वस्तू दिल्या.

**पोर्तुगीज जहाजांना मराठा जहाजांनी मारलेली टक्कर (इसवी सन १७७२–७३) :**

यावर्षी आरमार हेट स्वारीस असताना आचऱ्याच्या समुद्रावर फिरंगी सरईची (पोर्तुगीज लढाऊ जहाजाची) गाठ पडली. त्यावेळेस मराठा आरमारातील रामप्रसाद गुराबावरील लोकांनी मातबर लढाई केली. अगदी पोर्तुगीज जहाजाच्या बोडदास बोडद भिडवून मारगिरी केली. बोडद म्हणजे जहाजाची उजवी आणि डावी बाजू पोर्तुगीजांच्या जहाजांवर आदळवून लढाई केली. यावेळेस मराठा आरमारातील गणेश प्रसाद, नारायण प्रसाद व महादेव प्रसाद या गुराबांवरून आणि फतेलष्कर. शंभू, सवाई समशेर, बहिरी व सऊला इत्यादी गलबतांवरून जोरदार हल्ला केला गेला.

**दर्यावर्दीची मेहनत (मंगळवार, २ मार्च १७७३) :**

पूर्णगडच्या बाऱ्यावर पोर्तुगीजांच्या आरमाराची व सरकारच्या आरमाराची गाठ पडली. लढाई सुरू झाल्यावर विजयदुर्गच्या बंदरातून जानराव धुळपही गलबते घेऊन लढण्यास निघाले; परंतु त्याचवेळेस जोराचा उतराण (उत्तरेकडील) वारा सुटला होता. त्यामुळे समुद्रात शिरण्यास अडचण येत होती. तरीही गलबतांवरील दर्यावर्दी यांनी भारी मेहनत करून गलबते बाहेर पूर्णगडच्या दिशेने नेली. त्यासाठी त्यांना बक्षीस दिले.

**श्री रहाटेश्वर नवसाला पावला (रविवार, २१ मार्च १७७३):**

कृष्णाजी धुळप उपर स्वारीस असताना पोर्तुगीजांच्या दोन सरई आणि त्याच्या सोबत तीन सावकारी सिबाडे होती. त्यांच्याशी जोरदार लढाई झाली. लढाई जिंकावी म्हणून श्रीदेव रहाटेश्वर मौजे ताभाने तर्फ खारेपाटण यास नवस केला की; काही लाभ झाल्यास

जंबूरा तोफ देऊ. याप्रकारे नवस बोलून झुंजास प्रारंभ केला. लढाई मातबर झाली. शेवटी सावकारी सिबाडातून एक सिबाड पाडाव करून आणले. मग नवस बोलल्याप्रमाणे श्रीरहाटश्वर यास एक जंबूरा तोफ १ शेर दारूची अर्पण केली.

**इतर आरमारांना मराठ्यांची मदत (इसवी सन १७७२-७३):**

मराठा आरमाराची इतर आरमारांशी केवळ लढाईच होत नसे. काही वेळेस इतर आरमारातील जहाजांना मदतही केली जात असे. उदाहरणादाखल - १) एक इंग्रजी तराडे हेट (दक्षिण) प्रांतातून मुंबईस जात असताना विजयदुर्गच्या समुदात या जहाजाला उतराण वारा भारी लागला. त्यामुळे ते विजयदुर्ग येथे नांगरवाडीस राहिले. जहाजावर पाण्याचा तोटा होता. सबब तराड्यावरील कप्तान पाणी मागावयास आला असता पाणी दिले. २) इंग्रजी सावकारी बतेल्याची कुभारूच्या बाऱ्यावर (समुद्रावर) सरकारी आरमाराशी गाठ पडली असता बतेल्यावर धान्यास तोटा आहे असे त्या बतेल्यावरील सावकाराने सांगितले त्याच्या विनंतीवरून धान्य दिले.

**दामाजी नाईक कुवेसकर यांची प्राणाहुती (इसवी सन १७७४-७५) :**

या वर्षी आरमार उपर स्वारीवर असताना दोन इंग्रजी जहाजांची रत्नागिरीच्या समुद्रावर गाठ पडून मातबर लढाई झाली. लढाई चालू असताना मराठा आरमारातील शमशेरजंग पाल वाऱ्याच्या उलट दिशेला गेल्यामुळे आरमारापासून दूर गेला. वारा गैरसोयीचा असल्याने मदत करता येईना; तरीही शमशेरजंग पालावर असलेल्या दामाजी नाईक कुवेसकर व मायाजी नाईक वेतूरकर वगैरे सरदारांनी आणि इतर सैनिकांनी शिपाईगिरीची शर्थ केली. या लढाईत दामाजी नाईक कुवेसकर याने प्राणाची आहुती दिली. लढाई चालू असताना शमशेरजंग पालावरील दारूखान्याला आग लागून शमशेरजंग पाल जळून दर्यागर्क झाले. लढाईत मराठा आरमारातील जे सैनिक जखमी झाले त्यांची नावे पुढीलप्रमाणे-शेख अब्दुल गनीकर, मौलाना जमातदार, मायाजी नाईक वेतूरकर,मीर इमाम दिमत महमद खान, याकुब नाईक जेंजालदार, शेख अली, शेख कासीम. तसेच जहाज बुडाल्यानंतर दर्यावर्दी पाणबुडे यांनी समुद्रात खोलवर जाऊन जहाजासोबत बुडालेल्या चापाच्या व काकड्याच्या बंदुका, जेजांल, बडचिरी?, बाकमार (एक प्रकारचा खंजीर) इत्यादी गोष्टी शोधून वर काढल्या.

**वाऱ्याच्या मदतीने वलंदेज आणि पोर्तुगीजांचे पलायन (इसवी सन १७७४-७५) :**

रेवदंड्याचे समुद्रावर वलंदेजी तराड्यांची गाठ पडली ते समयी

लढाई मातबर झाली. ही लढाई एक दिवस चालली. परंतु वलंदेजी जहाजांना उतराण वारा (उत्तरेकडील वारा) सोयीचा लागल्याने जहाजे पळून गेली. तसेच स्वारीवरून परत येत असताना रेवदंड्याचे बाऱ्यावर बाहेर तीन जांबावर (जांब म्हणजे बहुदा जहाज ज्या ठिकाणी समुद्रात आहे तिथून किनारा किती लांब आहे ते मोजण्याचे परिमाण असावे) फिरंग्यांच्या दोन लढवय्या सरईंची गाठ पडली. त्यांच्यासोबत एक संपूर्ण दिवस मातबर लढाई झाली. सरईस वारा सोयीचा लागोन त्या निघोन गेल्या.

**मराठा आरमारातील धारकऱ्यांचा पराक्रम (इसवी सन १७७४-७५):**

रत्नागिरीच्या बाऱ्यावर इंग्रजी काफल्याची गाठ पडली. यामध्ये काही लढाऊ जहाजे आणि व्यापारी जहाजे होती. त्यांचा पाठलाग मराठा आरमाराने केला आणि केळशीच्या समुद्रावर त्यांना गाठले. मराठा आरमाराने सात गलबतांवर चांगले धारकरी लोक चढवून त्यांना इंग्रजी काफल्यावर हल्ला करण्यास पाठविले. त्यावेळेस इंग्रजी जहाजे आणि आपल्या गलबतांची मातबर लढाई झाली. ही लढाई मराठा आरमाराने जिंकली व सावकारी जहाजे हस्तगत केली.

**विजयदुर्गवर हल्ल्याची अफवा :**

शनिवार १२ नोव्हेंबर १७७४ रोजी विजयदुर्ग येथे एक अफवा पसरली की, पोर्तुगीज आरमार विजयदुर्गवर हल्ला करणार आहे. अशी आवई उठल्यामुळे आरमाराकडील लोकांनी रात्रंदिवस मेहनत करून पाल, गुराब, गलबते युद्धासाठी सज्ज केली; परंतु हल्ला झालाच नाही.

**श्रमपरिहारासाठी गूळ, सरबत, खारीक आणि खजूर (इसवी सन १७७४-७५) :**

अंजनवेलीच्या समुद्रावर इंग्रजांच्या तराड्याची (जहाजाची) गाठ पडली. त्यावर तीन प्रहर मारगिरी केली. त्यामुळे लोकांना भोजन करायलाही वेळ मिळाला नाही. सबब लढाईनंतर श्रमपरिहार म्हणून गूळ, खारीक, खजूर आणि सरबतासाठी आंबसोल (आमसूल) दिले.

**चाच्यांनी पळविले हिशेबाचे रुमाल (इसवी सन १७७५-७६) :**

यावर्षी विजयदुर्ग येथील आरमाराच्या दोन वर्षांच्या हिशेबाच्या कागदपत्रांचे रुमाल पुण्याच्या कचेरीतून तपासून घेण्यासाठी विजयदुर्गच्या कचेरीतील कारकून, रुमाल घेऊन हिरकणी गलबतावर स्वार होऊन निघाले. प्रवासात पूर्णगडच्या समुद्रावर चाच्यांच्या तीन गलबतांशी गाठ पडून लढाई झाली. सरकारचे हिरकणी गलबत चाच्यांनी धरले. त्यावरील सर्व सामान चाच्यांनी लुटून नेले आणि कारकुनांना एका इंग्रजी जहाजावर सोडून दिले. लुटून नेलेल्या सामानात हिशेबाच्या कागदपत्रांचे रुमाल आणि काही दागिने होते.

हिशेबाच्या कागदपत्रांचे रुमाल चाच्यांनी नेल्यामुळे त्यावर्षी प्रांताच्या कचेरीत असलेल्या कागदपत्रांच्या पुन्हा नकला करून पुण्याला हिशेबाची कागदपत्रे तपासण्यासाठी नेण्यात आली.

**कच्छी जहाजांशी लढाई (इसवी सन १७७७-७८) :**

कृष्णाजीराव धुळप हेट स्वारीस असताना गोव्याच्या बाहेर पंधरा जांबावर (जांब म्हणजे बहुदा किनाऱ्यापासून आत समुद्रातील लांबी मोजण्याचे परिमाण) कच्छी म्हणजेच कच्छ, गुजराथ येथील ४ सावकारी डंग्या भेटल्या. त्यांच्यासोबत आठ प्रहर लढाई केली. दोन डंग्या पळोन गेल्या, एक डंगी तोफगोळे मारल्याने दर्यागर्क झाली तर एक डंगी हस्तगत केली.

**इंग्रजांचा दारुण पराभव (इसवी सन १७८२-८३) :**

या वर्षी सुभेदार आनंदराव धुळप उपर स्वारीस गेले असताना रत्नागिरीच्या बाऱ्यावर (समुद्रावर) इंग्रजी तराडे १, बतेले २ व सिबाडे २ एकूण ५ जहाजे लढाईचे सामान भरून कर्नाटक प्रांती जात असता गाठ पडली. याच वर्षी इंग्रजांनी हैदरअलीचा काही प्रांत ताब्यात घेतल्यामुळे त्या प्रांताचा बंदोबस्त करण्यासाठी ही जहाजे मुंबईहून कर्नाटककडे जात होती. या जहाजांची मराठा आरमाराशी गाठ पडली आणि तीन प्रहर मातबर लढाई झाली. आनंदराव धुळप यांच्या नेतृत्वातील मराठा आरमाराने इंग्रजांचा दारुण पराभव केला आणि पाचही जहाजे हस्तगत करून विजयदुर्ग येथे आणली. या जहाजांवर इंग्रजांच्या सैन्यातील जनराल (जनरल), कप्तान आणि इतर लोक होते. पुढे इंग्रजांनी सरकारात अर्ज केला त्यावरून त्यांना सोडून देण्यात आले. या लढाईत मराठ्यांच्या नारायण पालावरील बालराम जमातदार तोफगोळा लागून मृत्यू पावला.

**हिरोजी सिरसकरचे बलिदान (इसवी सन १७९०-९१) :**

या साली कर्नाटक प्रांती बंदर किनारा कुंदापूर, येथील किल्ल्यास मोर्चेबंदी केली होती. त्यावेळेस हिरोजी सिरसकर याच्या छातीस गोळी लागून ठार झाला. त्याच्या कुटुंबास बालपरवेसी दिली.

**कुलाबा, सागरगड, अलिबाग आणि साकरीची लढाई (इसवी सन १७९३-९४) :**

१) आरमार कुलाब्याचे मसलतीस होते. तिथे आरमारकरी लोकांनी खुश्कीस (जमिनीवर) उतरून मोर्चे लावले आणि लढाई केली. लढाई चालू असताना लोकांना फार मेहनत पडली आणि उपोषण घडले सबब त्यांना गूळ, कांदे वगैरे जिन्नस दिले. २) सागरगडावर हल्ला केला तेव्हा तीन प्रहरपर्यंत लढाई केली. लोकांना लढाईमुळे उपवास घडला सबब गूळ, कांदे, भांग, तंबाखू, कुसुंबा (लाल रंगाची पालेभाजी),

इत्यादी दिले. ३) अलीबागेत लढाई करिता लोकांना उपोषण घडले सबब गूळ, कांदे, फुटाणे इत्यादी दिले. ४) साकरीस मोर्चे लावताना लोकाना मेहनत भारी पडली सबब त्यांना तंबाखू आणि भांग दिली.

**रेवदंड्याच्या बंदरी सुकाण तुटले (इसवी सन १७९३-९४) :**

या साली आरमार कुलाब्यावर हल्ला करण्यास गेले असताना माधवराव हरी फडके सरकारातून बोलणी करण्यास आले होते. बोलणी झाल्यानंतर माधवराव हरी फडके पाल (लढाऊ जहाज) पाहण्यासाठी त्यावर चढले. नंतर त्याच पालावरून माघारी येताना रेवदंड्याच्या बंदरात आल्यावर खराब्याला लागून त्याच्या धक्क्याने पालाचे सुकाण उडून गेले आणि पाल खराब्यावर अडकले. नंतर रात्रीचे जवळपास अडीच प्रहरपर्यंत लोकांनी मेहनत करून टांकण्या टाकून पाल बाहेर ओढून काढले.

**सात डावांशी लढाई (इसवी सन १७९५-९६) :**

मिठोरेच्या समुद्रावर सात डावांची गाठ पडली त्यावेळेस त्यांच्यासोबत लढाई झाली.

**सुभेदार मोत्याजीराव विचारे, एक पराक्रमी सरदार (इसवी सन १७६९-७०) :**

या एका वर्षासाठी सरदार मोत्याजीराव विचारे यांच्याकडे विजयदुर्गच्या आरमाराची सुभेदारी होती. त्यांना याच वर्षी विजयदुर्ग किल्ल्यावर नवीन घर बांधून दिले. मोत्याजीराव विचारे यांनीही धुळप यांच्याप्रमाणेच स्वाऱ्या केल्या आणि मोठा पराक्रम केला. या वर्षात मोत्याजीराव २ महिने ११ दिवस हेट (दक्षिणेकडे) स्वारीवर गेले होते.

**फरासिसांचा (फ्रेंच) पराभव :**

मोत्याजीराव विचारे व बालाजी हरी फडणीस हेट स्वारीवर गेले असता मयांच्या ? समुद्रावर फरासीसाच्या (फ्रेंचांच्या) जहाजाची गाठ पडली त्यावर मारगिरी मातबर केली त्यामुळे फ्रेंच जहाज पळून गेले.

**मोत्याजीरावांचा सुरतच्या समुद्रावरील पराक्रम :**

यावर्षी मोत्याजीरावांच्या नेतृत्वात आरमार उपर स्वारीस असताना सुरतच्या समुद्रावर वलंदेजी (डच) तराड्याची गाठ पडली. तीन दिवस लढाई मातबर झाली. तराडे सुरतेचे नालीत? पळोन गेले. त्यावेळेस झालेला एकूण खर्च : दारू - सवातीन मण १ पायली सवा चार शेर, २४९ तोफगोळे, गर्भछाटी गोळे १२, ५९० बंदुकीच्या गोळ्या, ४ दांडीचे गोळे.

**डहाणू आणि वेसाव्याच्या समुद्रावर :**

उपर स्वारीत असताना डहाणूच्या समुद्रावर एक डंगी दिसली.

तिच्यावर मारगिरी केल्यावर डंगी पळून गेली. तसेच वेसावेच्या समुद्रावर रात्रीच्या वेळेस डंगी भेटली. तिच्यावर मारगिरी केली; परंतु नंतर समजले की ती डंगी कौली होती सबब सोडून दिली.

**सरदार विठोजी नाईक बावकर :**

विठोजी नाईक बावकर यानेही एक हेट स्वारी केली त्यावेळेस मंगरूळच्या समुद्रावरून मलबारी मंजी धरून आणली.

वरील माहितीवरून सहज लक्षात येते की, धुळप घराण्यातील सर्वच धुरंधरांनी आणि आरमारातील इतरही सरदारांनी, सैनिकांनी आपल्या पराक्रमाने मराठा आरमाराचा दरारा समुद्रावर कायम ठेवला होता. धुळप घराण्यातील या सर्व पराक्रमी पुरुषांना, त्यांच्या सोबत असलेल्या सर्व परिचित आणि अपरिचित सरदार आणि सैनिकांना मानाचा मुजरा.

***



प्रकरण ६ :

# वादळात अडकलेल्या जहाजांच्या कहाण्या

स्वारीवर असताना किंवा मालाची आयात-निर्यात करताना गुराब, गलबते इत्यादींना समुद्रावर ज्या संकटाचा नित्य सामना करावा लागत असे ते म्हणजे समुद्रावर वेळी-अवेळी निर्माण होणारी वादळे. आजच्या आधुनिक युगात विज्ञानाची कमालीची प्रगती झाली असल्याकारणाने हवामानाचा अंदाज वर्तविणारी अनेक उपकरणे मानवाने तयार केली आहेत. परंतु तीनशे वर्षांपूर्वी अशी कोणत्याही प्रकारची यंत्रणा नसताना जहाजे घेऊन समुद्रात स्वारीवर जाणे, लढाया करणे हे मोठ्या मर्दुमकीचेच काम म्हणावे लागेल. कारण समुद्रावर कोणत्या क्षणी वादळ निर्माण होईल आणि मृत्यूशी गाठ पडेल, याचा काही भरवसा नसे. पेशवे दप्तरातील मोडी कागदपत्रांमधून वादळात सापडलेल्या जहाजांविषयीच्या नोंदी आढळून आल्या. त्यातील माहितीनुसार काहीवेळेस जहाजांवरील दर्यावर्दी यांनी मर्दुमकी करून जहाजांची वादळातून सुटका केली तर काही वेळेस जहाजे दर्यागर्क झालीत. वादळात सापडलेल्या अशाच काही जहाजांच्या सत्य कहाण्या आपण या प्रकरणात पाहणार आहोत.

**वादळात बुडालेल्या संभू आणि नवरतन या दोन गलबतांची कहाणी:**

इसवी सन १७६० साली अंजनवेल बंदरातील संभू आणि नवरतन ही दोन गलबते स्वारीसाठी निघाली असता मौजे कोलथरे तर्फ पंचनदी येथील समुद्रावर मोठे वादळ झाले. मग पडाव टाकावा यासाठी ही दोन्ही गलबते सुवर्णदुर्गच्या बंदरात गेली. तेथेही उतराण (उत्तरेकडून वाहणारा) वाऱ्याने फार हैराण केले. एक संपूर्ण दिवस गलबतांवरील शिपाई आणि दर्यावर्दी यांनी खूप प्रयत्न केले; परंतु वादळ मोठ्या प्रमाणावर असल्याने दोन्ही गलबते शनिवार, दिनांक १ नोव्हेंबर १७६० रोजी दिवसाच्या तिसऱ्या प्रहरात सुवर्णदुर्गच्या समुद्रावर दर्यागर्क झाली म्हणजेच बुडाली. त्या दोन्ही गलबतांवर जे सामान होते ते बुडाले आणि गलबतेही फुटली. बुडालेल्या सामानापैकी काही सामान पाणबुडे यांनी बाहेर काढले. यासाठी त्यांना बक्षीस दिले. गलबत संभू फुटून त्याचे सुमारे १७ तुकडे झाले. त्याचे जे काही लोखंड शिल्लक होते ते काढून घेतले. तसेच गलबतावर एक होडी होती ती सापडली. गलबत नवरतन फुटून जाया झाले परंतु त्याचा कठडा मात्र सापडला. तसेच गलबताच्या पागेची (जहाजाच्या

मागील बाजूचा दोरखंड) होडी सापडली. दोन्ही गलबतांमधून बुडालेले सामान - दारू, ताग, साधा काथा, आगरी काथा, कापूस, सुतळी, गोडे तेल, सुत इत्यादी. वर काढलेले सामान - तासणी, चाव्या, साखळ्या, तवे, कुऱ्हाड, कोयते, खुरपी, तोफगोळे, भाल्याची कणसे, बंदूक, तरवार, निमचा, तोफा, भांडी, शिडे, निशाणे, खलिते, नगारे, कर्णा, झांज, सळया, शिशाच्या गोळ्या २००, तोफा, तोफांचे लाकडी गाडे, कप्पे, सुकाण, डोलकाठ्या, गजकुंचे, बादल्या, इत्यादी.

**जयगडच्या बंदरात छावणी (इसवी सन १७६१) :**

रविवार १४ जून १७६१ रोजी भात (तांदूळ) आणण्यासाठी काही गलबते पाठविली होती. परंतु मार्गी वादळ फार पडले, सबब गलबते जयगडच्या बंदरात छावणीस राहिली.

**गोव्यातील वादळ आणि फतेबक्ष तराडे (इसवी सन १७६१):**

फतेबक्ष नावाचे व्यापारी तराडे गोव्यास बईदखोल येथे छावणीस आहे अशी बातमी जासुसांनी दिली. सबब आरमार पाठवून. तराडे पाडाव करून आणत असता बईदखोलच्या समुद्रावर पाउस आणि वादळ भारी प्रमाणात पडले. त्यावेळेस आरमारातील लोकांना दिलेली अडशेरी (धान्य) भिजून गेली. विजयदुर्ग येथे परतल्यावर त्याची भरपाई दिली.

**दर्यावर्दींची मर्दुमकी (इसवी सन १७६३-६४) :**

१) कृष्णाजी नाईक जैतापूरकर हे उपर स्वारीस गेले असता वादळ भारी पडले त्यावेळेस गुराब गणेशप्रसाद आरमाराच्या ताफ्यातून चुकले. वादळ जोराचे असतानाही गुराब गणेशप्रसादवरील दर्यावर्दी यांनी मोठी मेहनत, मर्दुमकी करून गुराब परत आरमारात नेले २) केळशी व सुवर्णदुर्ग यामधील समुद्री मार्गावर रघुनाथ नावाचे गलबत स्वारीस असताना रात्रीच्या वेळेस मोठे वादळ पडून गलबत बुडायला लागले. त्यावेळेस दर्यावर्दी यांनी मोठी मर्दुमकी करून, पतींगे (वल्हे) मारून गलबत सुवर्णदुर्गच्या बंदरात सुखरूप नेले. सबब त्यांना बक्षीस दिले.

**रेवदंड्यावर आलेली इंग्रजी ग्याली (इसवी सन १७६४-६५) :**

एक इंग्रजी ग्याली (जहाज) पळून जंजीरे रेवदंडा येथे आली होती. कदाचित इतर कोणत्यातरी आरमाराशी किंवा चाच्यांशी त्यांची गाठ पडली असावी. त्या जहाजाची परभान काठी व कळंबी काठी वादळाने मोडून समुद्रात बुडाली होती. रेवदंड्यावर इंग्रजी जहाजावरील सर्वांना अटक करून ठेवले. परंतु इंग्रजांशी हुजुरचा (पेशव्यांचा) तह झाला असल्याने ग्याली इंग्रजाचे स्वाधीन करून जे सामान लागेल

ते द्यावे अशी आज्ञा हुजुरांकडून आली. त्यावरून इग्रजी जहाजाचा जो कप्तान होता त्याला जे लागेल ते किरकोळ सामान दिले आणि ग्याली सोडून दिली. या ग्यालीवर दोन घोडीही होती ती वादळामुळे तराडे हादळल्याने दोराचा हिसका बसून जखमी झाली होती. सबब त्यांना औषधपाणी दिले. तसेच ग्यालीवरील काफरी (सिद्दी) मयत झाला त्याच्या कफनाबद्दल म्हणजेच अंत्यसंस्कारासाठी खर्च झाला.

**वादळाने नांगर तुटला (इसवी सन १७६४–६५) :**

सरदार कृष्णाजी नाईक जैतापुरकर हेट स्वारीस गेले असताना वादळ भारी पडले त्यावेळेस आचऱ्याच्या समुद्रावर यशवंती गलबताच्या वल्ह्याचे पाते तुटले आणि नांगर समुद्रात बुडाला.

**सेरवा गलबत फुटले (इसवी सन १७६४–६५) :**

सेरवा नावाचे गलबत वसईस जात असताना वाटेत भारी वादळ पडले त्यामुळे गलबत खडपावर आपटून फुटले.

**खाडीला आलेला पूर (इसवी सन १७६४–६५) :**

मौजे गिरये येथील गोदीवरून सोटे आणण्यासाठी लांगबोट गेली होती त्यावेळेस ओहोटीची वेळ झाल्याने खाडीला पूर आला सबब नांगरवाड्यास राहिली होती; परंतु वादळ जोराचे पडल्यामुळे अलाथ (वल्हे) तुटून लोईली (नांगर) पाण्यात गेली.

**साहेबासदर गुराब फुटली :**

शुक्रवार ६ जून १७६४ गुराबा साहेबासदर वादळामुळे उडीच्या? बंदरी फुटली. त्यावरील लोक पादचारी मार्गे मौजे रील येथे आले त्यांना वाटेत जेवण मिळाले नाही म्हणून मौजे रील पैकी तांदूळ दिले

**गोव्याच्या समुद्रावरील वादळ (इसवी सन १७६६–६७) :**

या वर्षी आरमार कर्नाटक प्रांतात असताना गोव्याच्या समुद्रावर वादळ झाले त्यामुळे आरमारातील गलबतांची चुकामूक झाली. वादळ मोठे असल्याने गलबताच्या काठ्या तोडून गलबतावर जे सामान होते ते समुद्रात सोडून दिले तरीही निभाव लागेना. शेवटी सावंतांच्या मुलखात कोचरेच्या बंदरात दोन मंज्या आणि काही गलबते फुटली जहाजे किनाऱ्यावर घेऊन त्यांच्या दुरुस्तीसाठी विजयदुर्गाहून कारकून आणि लोक पाठविले आणि जहाजात शिरलेली वाळू काढून त्यांची दुरुस्ती केली.

**दिरबा देवीने वादळातून वाचविले (इसवी सन १७६९–७०) :**

सुभेदार मोत्याजीराव विचारे उपर स्वारीस गेलेले असताना समुद्रात वादळ भारी पडले, लोकांस जेवण करायलाही वेळ मिळाला नाही. सबब पाण्याबरोबर गुळ दिला. याच वेळेस वादळातून वाचण्यासाठी मौजे जामसडे तर्फ सालसी येथील श्री दिरबा देवीला नवस केला की

वादळातून सुखरूप बाहेर पडलो तर १ पातळ व १ खण अर्पण करू. वादळातून मराठा आरमार सुखरूप बाहेर पडल्यावर नवस पूर्ण केला. त्यासाठी सहा रुपये ५ आणे इतका खर्च आला.

**दंडा राजपुरीच्या समुद्रावरील वादळ इसवी सन १७७१-७२ :**

राजपुरीच्या समुद्रावर वादळ भारी पडल्यामुळे समुद्राचे पाणी गुराबात येऊन चुलदाने विझली. दोन दिवस जेवणही मिळाले नाही. दोन दिवसांनी लोकांना भाकरी करून दिल्या.

**अलीराजाच्या गुराबेचा मचवा :**

अलीराजा कनानुरकर (कन्नूरकर) याची गुराब उपर स्वारीवरून परत हेट (दक्षिण) प्रांती जात होती. गुरुवार दिनांक ४ जून १७७२ रोजी रत्नागिरीच्या समुद्रावर वादळ भारी पडल्यामुळे गुराबाच्या पाठीमागे दोरीने बांधलेला मचवा दोरी तुटून रात्रीच्या वेळेस वाहत वाहत रत्नागिरीच्या बंदरात आला. त्या मचव्यावर एक सिद्दी पहारेकरी होता. तो रत्नागिरीहून विजयदुर्ग सुभ्यास आला. त्याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था केली गेली.

**वादळामुळे उपवास घडला :**

फतेजंग पाल स्वारीवर असताना गुरुवार, ३ जून १७७३ या दिवशी सुरतच्या समुद्रावर वादळ भारी पडले आणि समुद्राचे पाणी पालाच्या आत आल्यामुळे चुलदाने भिजली. लोकांना दोन दिवसपर्यंत जेवण मिळाले नाही. सबब गूळ-पाणी, सरा दिली. तसेच थंडी वाजू लागली म्हणून तंबाखू दिली.

**दौलती माहागिरी बुडाली अन इंग्रजी फतेमारीने मदत केली (इसवी सन १७७४-७५) :**

दौलती नामक महागिरी कनानुरास (कन्नूरास) म्हणजेच अलीराजाच्या संस्थानात जहाजांच्या काठ्या व काथे आणण्यासाठी पाठविली होती. परत येत असताना मोठ्या वादळात सापडून दर्यात बुडाली. त्यावरील दर्यावर्दी लोकांना इंग्रजी फतेमारीने दर्यातून किनाऱ्यावर आणले.

**चिमणी झाली उपडी :**

चिमणी नावाची महागिरी खारेपाटणास तेल आणण्यास पाठविली होती. शनिवार, दि.२४ ऑगस्ट १७७६ रोजी खाडीत जात असताना वादळामुळे पाण्याला पूर आला आणि महागिरी उपडी झाली. त्यामुळे महागिरीवरील सर्व समान बुडाले.

**वेताळ गलबताचा अपघात (इसवी सन १७७९-८०) :**

पोर्तुगीजांचे वेताळ नावाचे गलबत किले देवदुर्गच्या समुद्रावर उपडे होऊन त्यावरील लोक मयत झाले. गलबत दर्यात उपडे वाहत

होते ते आरमाराच्या लोकांनी पाहिले व पाग (दोरी) लावून आणले. इथे एक गोष्ट समजत नाही की, हे गलबत पोर्तुगीजांचे होते तरी त्याचे नाव वेताळ कसे काय? कदाचित हे गलबत आधी मराठ्यांचे किंवा इतर कुणाचे तरी असावे आणि ते पोर्तुगीजांनी जिंकून घेतले असावे.

**दंडा राजपुरीच्या समुद्रावरील वादळ आणि राघोजी आंग्रेंनी केलेली मदत :**

इसवी सन १७८२ साली लक्ष्मणराव धुळप यांच्या नेतृत्वात गुराब रामप्रसाद, गुराब शिवप्रसाद व गुराब गणेशप्रसाद आणि ५ गलबते घेऊन मराठ्यांचे आरमार स्वारीवर निघाले. त्यापैकी ४ गलबते सुवर्णदुर्ग, अंजनवेल येथे सरकारी कामास ठेवून तीन गुराबा आणि रामबाण गलबत स्वारीस निघाले. स्वारीवर असताना शुक्रवार १९ एप्रिल ते सोमवार २२ एप्रिल १७८२ असे चार दिवस दंडा राजपुरीच्या समुद्रावर मोठे वादळ झाले आणि आरमाराची मोडतोड होऊन गुराब शिवप्रसाद, गुराब गणेशप्रसाद ही दोन गुराबे राजपुरीजवळ असलेल्या नांदगाव मुरूडच्या खडकावर आपटून फुटली. तसेच रामप्रसाद गुराबाच्या दोन काठ्या वादळाने मोडून दर्यात वाहून गेल्या आणि सर्व सामानही बुडाले. रामप्रसाद गुराबाचा कलाशा (बहुदा शिखराकडचा भाग) समुद्राच्या लाटेमुळे निखळला आणि गुराब रेवदंड्याच्या किनाऱ्यावर वाळूत येऊन अडकली. रामबाण गलबत दर्यात पालथे होऊन वाहत वाहत उंदेरीजवळ खुसकीस (जमिनीस) लागले नंतर पुन्हा वाहत वाहत कुलाब्याच्या बंदरात गेले. ही गोष्ट समजताच लक्ष्मणराव धुळप हे राघोजी आंग्रे यांच्याकडे गेले आणि गुराबा वाळूतून काढण्यासाठी लोकांची मदत मागितली. तसेच कुलाब्याकडे वाहत गेलेल्या गलबतासाठी काठ्याही मागून घेतल्या आणि गलबत, गुराबे चालती करून पुन्हा विजयदुर्ग येथे नेली.

**नरनाग गलबत दर्यागर्क आणि त्यावरील लोकांचा मृत्यू (इसवी सन १७९०–९१) :**

या वर्षी हेट स्वारीस गलबते गेली असता वेंगुर्ल्याच्या समुद्रावर वादळ पडोन गलबत नरनाग दर्यागर्क झाले व त्यावरील काही लोक बुडून मयत झाले.

मराठ्यांच्या आरमारातील वादळात अडकलेल्या जहाजांच्या मोडी कागदपत्रांतील या सत्य कहाण्या वाचल्यावर त्या काळात समुद्रावरील सफरी या किती धोकादायक होत्या, हे लक्षात येईल. तसेच, या धोकादायक प्रवासात स्वतःच्या जीवाची पर्वा न करता जहाजांवरील मराठा सरदार, सैनिक, दर्यावर्दी इत्यादींनी जहाजे वाचविण्यासाठी जी मर्दुमकी दाखविली आहे, त्याचे प्रत्येक मराठी माणसाला कौतुक वाटल्याशिवाय राहणार नाही.

***

प्रकरण ७ :

# नवस आणि देवस्की

साधारण तीनशे वर्षांपूर्वीच्या समाजव्यवस्थेतील वेगवेगळ्या परंपरा, श्रद्धा, रुढी इत्यादींची माहिती मोडी कागदपत्रांमधून नेहमीच वाचायला मिळते. १८ व्या शतकात वेगवेगळ्या देवी-देवतांना केले जाणारे नवस, देवस्की, दैवी शक्ती, असुरी शक्ती यांचे अस्तित्व आणि त्यांच्याविषयी असलेल्या श्रद्धा इत्यादींविषयी विजयदुर्गच्या कागदपत्रांमधून ज्या नोंदी आढळून आल्या, त्याचाच आढावा या प्रकरणात घेऊयात.

**आरमाराकडील नवस :**

इसवी सन १७६१-६२ ते पुढील सर्वच वर्षांतील आरमाराच्या कागदपत्रांतून वेगवेगळ्या छोट्या-मोठ्या कारणांसाठी विविध देवी-देवता, पीर इत्यादींना केले जाणारे नवस यांविषयीची बरीच माहिती मिळते. हे नवस स्वारीत यश मिळावे, आरमाराच्या खर्चासाठी उत्तम प्राप्ती व्हावी, वादळ-वाऱ्यात जहाज अडकले असता सुखरूप सुटका व्हावी इत्यादी कारणांसाठी केले जात असत.

**संभाजी आंग्रे यांना केले जाणारे नवस :**

आरमाराकडे केवळ देवी-देवताच नव्हे तर मौजे गिरये येथील श्री संभाजी आंग्रे यांच्या समाधीलाही नवस केला जात असे. संभाजी आंग्रे यांची समाधी आरमाराच्या नवसाला पावते, अशी ठाम श्रद्धा आरमाराकडील लोकांची होती, हे कागदपत्रांतून स्पष्टपणे दिसून येते. स्वारीवर जाताना संभाजी आंग्रे यांच्या समाधीसमोर नारळ ठेवून मगच आरमार स्वारीवर निघत असे. याविषयीची इसवी सन १७७६-७७ सालातील नोंद पुढीलप्रमाणे : संभाजी वीर (संभाजी आंग्रे), श्रीरामेश्वर मौजे गिरये येथे श्रीसन्निध जागृत आहे. आरमारास पावतो सबब आसमानगिरी बांधावयास नवी करून दिली. यासाठी पावणे चवदा रुपयाचे कापड लागले. त्यापैकी पावणेसात रुपयाचे हमरूल (किनारेदार रेशमी वस्त्र) पावणेसात हात लांब, सवातीन रुपयाचे मशरू (गर्भरेशमी कापड) सवा चार हात सवा रुपयाचे पांढरे कापड अस्तरासाठी १७ हात, अडीच रुपयाचे तिवट (पागोट्याचे वस्त्र) हिरवे झालरीस १.

**मौजे गिरये येथील श्री रामेश्वरास केलेले नवस :**

**लघुरुद्राचा नवस :** भिकाजी रघुनाथ कारकून सुभ्याचे बेगमीसाठी

सरकारातून तरतूद केलेले तांदूळ आणण्यासाठी उपर स्वारीस गेले ते. परत येताना मंगळवार, २१ मे १७६५ या दिवशी समुद्रावर मोठे वादळ निर्माण झाले त्या वेळेस वादळातून काही अपाय न होता सुखरूप परत आलो तर श्री रामेश्वरास लघुरुद्र करू असा नवस केला आणि विजयदुर्ग येथे परत आल्यावर तो नवस फेडला.

**श्री रामेश्वर, श्री चवंडेश्वरी आणि संभाजी आंग्रे यांची समाधी नवसाला पावली. इसवी सन १७७१–७२ :**

जानराव धुळप आरमार घेऊन हेट स्वारीस जाण्याआधी सर्व सरदार इतर मंडळी यांना घेऊन गिरये येथील श्री देव रामेश्वर येथे जाऊन देवास नवस केला की स्वारी फते होऊन आरमार सुखरूप बंदरात परत यावे. पुढे स्वारीवर असताना पोर्तुगीजांशी लढाई होऊन सरई पाडाव करून आणली. परत आल्यावर लगेचच नवस बोलल्याप्रमाणे ५०० रुपये खर्च करून श्रीरामेश्वर देवालयाचे खांब चांदीने मढविले. तसेच ५०० रुपये गिरये येथील श्री चवंडेश्वरी देवस्थानास अर्पण केले आणि श्री रामेश्वर देवळाच्या बाजूला श्री संभाजी वीर म्हणजेच श्रीसंभाजी आंग्रे यांची समाधी आहे तिथे २५० रुपये अर्पण केले.

याच वर्षी इतर देवी देवतांना जंबुरे म्हणजेच छोट्या तोफा वाहण्याचे नवस केले होते ते पुढीलप्रमाणे : १ श्रीदेव कुणकेश्वर मौजे कुणकेश्वर तर्फ सालसी , १ श्री रामेश्वर मौजे तीरलोट तर्फ खारेपाटण, १ श्री देव विश्वेश्वर मौजे हिंदाले तर्फ सालसी, १ श्री देवी महाकाली मौजे अडीवरे तर्फ राजापूर. श्री देव कलेश्वर प्रांत कुडाळ.

**चंदनाचा लेप (इसवी सन १७७१–७२) :**

गुराबा हेट स्वारीस रवाना केल्या त्यावेळेस आरमारास चांगली प्राप्ती व्हावी यासाठी श्री देव रामेश्वरास चंदनाचा अभिषेक करण्यास दोन ब्राह्मण आसामी अनुष्ठानास ठेवले. त्यांना दक्षिणा, भोजन खर्च व नैवेद्य वगैरे दिले. पुढे अनुष्ठान सिद्ध होऊन हरीप्रसाद नावाची बेकौली डंगी धरून आणली.

**हैदरअलीचा पराभव आणि ब्राह्मणांची समाराधना : (इसवी सन १७७७–७८) :**

हरबाजीराव धुळप आणि सर्व सरदार मंडळी हेट स्वारीस जात असताना श्री रामेश्वरास प्रार्थना करून नवस केला की स्वारी फत्ते झाल्यास ५०० ब्राह्मणांची समाराधना करू. स्वारीवर गेल्यावर हैदर नाईक याच्या आरमाराची गाठ पडली आणि लढाई होऊन शत्रूच्या काफल्यातून एक जहाज धरून आणले. परत आल्यावर

बोलल्याप्रमाणे नवस फेडला.

**श्री रामेश्वराचे गुराबावरील निशाण (इसवी सन १७७१-७२):**

गिरये येथील श्री रामेश्वराचे निशाण शिवप्रसाद गुराबावर लावलेले होते. दर सोमवारी त्याची पूजा करून देवाच्या नावाने खिरापत वाटत असत.

**कारखान्यावरील देव-पूजा इसवी सन १७७१-७२ :**

आरमाराचा कारखाना मौजे हातदे तर्फ सौंदल येथे होता. तिथे जहाज बांधणीसाठी सोटे तोडण्यास सुरवात केली त्यावेळेस तिथे देवाच्या नावाने पूजा केली तसेच नदीची पूजा करून ओटी भरली.

**आंबोळगडच्या गणपतीला नवस :**

मंगळवार ६ ऑगस्ट १७७१ या दिवशी सदाशिव बलाळ हशमनिस सुवर्णदुर्गाहून गुराबे घेऊन हेट स्वारीस जात होते तेव्हा आंबोळगड येथील गणपतीस नवस केला की, पैदास्त चांगली झाली तर श्रींच्या नैवेद्यासाठी साखर अर्पण करू. पुढे पैदास्त चांगली झाली सबब साखर अर्पण केली.

**भटजीने काढून दिलेला मुहूर्त अन फत्ते झालेली स्वारी :**

रविवार १५ मार्च १७७२ या दिवशी आरमार स्वारीस निघाले असता रामभट ललित नावाच्या भटजीने मुहूर्त काढून दिला आणि करार केला की स्वारी फत्ते झाली तर त्याला १०० रुपये देण्यात यावेत. स्वारी फत्ते झाली आणि भटजीस १०० रुपये दिले. तसेच याच वेळेस देवांना नवस आणि अनुष्ठानही केले होते की आरमार स्वारीला गेल्यावर लक्ष रुपयाची पैदास्त व्हावी त्याप्रमाणे साखरेचे तराडे सापडले. त्यातील काही साखर चिपळूण बंदर आणि त्याच्या आसपास असलेल्या विविध देवस्थानांना देण्यात आली.

**राजापूर येथील श्री गंगेला नवस (इसवी सन १७७७-७८) :**

श्री गंगा राजापूर हिला नवस केला की स्वारी फत्ते झाल्यास १०० ब्राह्मणांची समाराधना करू त्याप्रमाणे तराडे (जहाज) पैदास्त करून बंदरात घेतले मग नवस फेडला.

**जैतापूरचा चोरगा चवाटा इसवी सन. १७७७-७८ :**

जैतापुरास चोरगा चवाटा  आहे. स्वारीस असताना त्याला नवस केला की फत्ते झाल्यास निशाणे देऊ. फत्ते करून बंदरात आल्यावर निशाण दिले. चवाटा म्हणजे चार रस्ते ज्या ठिकाणी एकत्र येतात ती जागा. कदाचित त्या ठिकाणी एखादा देव असावा.

**श्री गिरेश्वर दीपावलीच्या दिवशी पावला (इसवी सन १७७७-७८):**

या वर्षीच्या पहिल्या स्वारीस जात असताना श्रीगिरेश्वर मौजे अणसुरे यास नवस केला की दीपावलीचे दिवशी स्वारी फत्ते झाल्यास

नगारा व निशाण देऊ. त्याप्रमाणे डंगी सापडली सबब १ नगारा तांब्याचा व १ निशाण दिले.

**नवसाचे जंबुरे (इसवी सन १७७७-७८) :**

श्रीविठोबा किल्ले देवगड, श्रीदेव वेताळ मुकाम मिठोरा, पीर सलाम मीरा, मुकाम मिरज यांना नवसाचे जंबुरे दिले.

**आचऱ्याचा रामेश्वर (इसवी सन १७७६-७७) :**

सखाराम केशव हा सदाशिवरावभाऊंच्या तोतयाकडून लढाईस आला होता. त्याचे पारपत्यास जानराव धुळप स्वारी घेऊन रामगडास गेले होते. तो पकडला जावा म्हणून आचरे येथील श्री रामेश्वरास नवस केला होता. तो पकडला गेला सबब १ जंबुरा तोफ दिली.

**समुद्रावरील वादळ आणि देवी-देवतांना केलेले नवस (इसवी सन १७८१-८२) :**

गुराब शिवप्रसाद, गुराब रामप्रसाद व पाच गलबते हेट स्वारीस गेली होती. समुद्रामध्ये दहा-बारा दिवस मोठे वादळ पडले. वादळामुळे दोन गलबताच्या काठ्या आणि इतर मोडतोड खूप झाली. सबब आरमारावरील सरदार यांनी आरमार निभाऊन सुरक्षित यावे यासाठी वेगवेगळ्या देवांना नवस केला. आरमार बंदरात सुरक्षित आल्यावर नवस फेडला तो - ५ रुपये श्री दिरबादेवी मौजे जामसडे तर्फ सालसी, १० रुपये आणि ३५ ब्राह्मणांची समाराधना श्री देव रामेश्वर मौजे गिरये, पावणेचार रुपये अडीवरे येथील श्री महाकालीस पातळ १ पावणे तीन रुपयाचे, श्री महासरस्वतीस छिट (वस्त्र) १२ आण्याचे, ४ आण्याचा नारळ ७ देवांस, श्रीदेव लक्ष्मीनारायण व श्री नाटेश्वर मौजे नाटे यास १५ ब्राह्मणांची समाराधना.

**पीरांना नवस इसवी सन १७८१-८२ :**

आरमार बाहेर मावळणामध्ये (पश्चिमेकडे म्हणजेच मावळतीकडे) साठ वावपर्यंत गेले होते. (वाव म्हणजे लांबी मोजण्याचे परिमाण, एक वाव म्हणजे साधारण पाच हात अंतर) तेथे दोन बेकौली डंग्या पाडाव केल्यावर वाऱ्याचे तुफान भारी आले. त्यामुळे आरमारची मोडतोड होऊन नारायण पालात समुद्राचे पाणी मोठ्या प्रमाणावर शिरायला लागले. त्यापासून निभावणी व्हावी म्हणून पीरांना नवस केला.

**आचरे येथील श्री रामेश्वरास नवस इसवी सन १७८१-८२ :**

श्री देव रामेश्वर कसबे आचरे तर्फ सालसी या देवास असा नवस केला की आरमार स्वारीस जात आहे चांगली प्राप्ती झाली तर प्राप्तीतून दरशेकडा १ रुपया प्रमाणे अर्पण करू. परंतु आरमारास घोडे वाहून नेणारी एक डंगी सापडली. मग पुन्हा एकदा गुराबा घेऊन खासा धुळप स्वतः निघाले त्यावेळेस पुन्हा नवस केला तेव्हा दोन

डंग्या रुपारेल आणि रामप्रसाद या सापडल्या परंतु विशेष प्राप्ती झाली नाही. मग श्रीला अवसर आणून विनंती केली की, मातबर प्राप्ती होऊ देत यावर श्रीने सांगितले की, हेट जाऊ नये व उपरही जाऊ नये मावळणात (खोल समुद्रात) तीस जाबपर्यंत जावे. (जाब म्हणजे लांबी मोजण्याचे एखादे परिमाण असावे) श्रीने सांगितल्याप्रमाणे केल्यावर एक बंगाली तराडे सापडले, चांगली प्राप्ती झाली. मग परत आल्यावर नवस फेडला.

**वेताळाला नवस (खमस सीतेन) :**

सोमवार, ३ जून १७६५ रोजी भगवंतराव धुळप स्वारीस गेले होते. त्यावेळेस स्वारी फत्ते व्हावी यासाठी मिठोरे येथील वेताळास १२५ रुपये अर्पण करण्याचा आणि डोंगरावरील वेताळास ६ रुपये अर्पण करण्याचा नवस केला होता.

**श्री रामेश्वर, श्री महाकाली आणि श्री सोमेश्वर यांना नवस :**

सरकारातून आरमारासाठी तरतूद केलेले तांदूळ भाड्याच्या गलबतांवरून विजयदुर्ग येथे आणत असताना उरणच्या समुद्रावर गुरुवार १३ जून १७९३ रोजी रात्रीच्या वेळेस तुफान वारा सुटला आणि वादळ भारी पडले. गलबतांचा निभाव लागेना सबब देवांना नवस केला की गलबते सुखरूप विजयदुर्गच्या बंदरी सलामत गेली तर श्री रामेश्वरास लघुरुद्र व ५ ब्राह्मणांची समाराधना, श्री देवी महाकाली मौजे अडीवरे हिला १ पुतळी, श्री देव सोमेश्वर मौजे सोमेश्वर, रत्नागिरी यास लघुरुद्र करू. पुढे जहाजे सुखरूप आल्यावर नवस फेडण्यात आला.

**श्री दिरबादेवीस नवस (बुधवार १२ फेब्रुवारी १७९४) :**

गलबत दिरबाप्रसाद स्वारीवर असताना गलबतावरील भरतीचे लोक आजारी पडू लागले सबब श्री दिरबा देवी मौजे जामसंडे तर्फ सालसी हिला नवस केला की आजार दूर झाल्यावर निशाण करून देऊ, त्याप्रमाणे निशाण दिले.

**देवस्की :**

विजयदुर्ग येथील बंदरात प्रतिवर्षी सारंगधरची जत्रा व पीराचे नावे कंदोरी देऊन देवस्की केली जात असे. इसवी सन १७७१–७२ सालातील नोंदीनुसार हिंदू लोकांच्या सारंगधर देवासाठी १९ रुपये १२ आणे आणि मुसलमान लोकांच्या पिरासाठी १६ रुपये ५ आणे तीन पैसे इतका खर्च आला. तसेच वेगवेगळ्या कारणांसाठी वेगवेगळ्या देवी–देवतांना देवस्की करणे, शांती करणे इत्यादी गोष्टी नित्याच्याच असत.

**इसवी सन १७६२-६३ :**

गोदीतील गुराबांवर मोहे बसली होती त्याचे अरिष्ट निरसनार्थ अद्भुत शांती केली.

**आनंदराव धुळपांवर केलेली करणी इसवी सन १७८१-८२ :**

यावर्षी सुभेदार आनंदराव धुळप आरमार घेऊन स्वारीस जाण्याकरिता सुमुहूर्त बघून शुक्रवार ७ डिसेंबर १७८१ रोजी नारायण पालावर संध्याकाळच्या सुमारास चढले. दुसऱ्या दिवशी सकाळी आरमार घेऊन निघणार होते; परंतु रात्रीच्या समयी कोणी तरी कुभांड रचून स्वारीवर जाणाऱ्या प्रत्येक गुराबाजवळ कोंबडे, नारळ, कुंकू टाकलेला भात, मसुराची डाळ, पिवळे तांदूळ, रुमाल, दोरवी (चट्‌ट्या-पट्‌ट्याचे कापड) इत्यादी वस्तू आणून पुरल्या. हे कोणी केले त्याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला परंतु त्याचा ठाव लागेना म्हणून श्री देवास म्हणजेच गिरयेच्या श्री रामेश्वराचा अवसर (आवेश) आणून त्यास कारण विचारले. अवसर म्हणजे रामेश्वराचा जो पुजारी असेल त्याच्या अंगी देवाचा संचार झाल्यावर प्रश्नोत्तरे होतात त्याला अवसर म्हणतात. देवाने संचारात येऊन सांगितले की, स्वारी अयशस्वी व्हावी यासाठी हा तोडगा कुणीतरी केलेला आहे. सबब त्याचे निवारण व्हावे म्हणून संपूर्ण बंदरावरून आणि आरमारावरून बकरे, एक रुमाल, एक नारळ, तांदूळ ओवाळून टाकावे आणि चिरी पान तोडण्याबद्दल खुर्दा (चिल्लर) द्यावा. देवांनी सांगितले तसे केले आणि अद्भुत शांतीही करण्यात आली.

**आजारपण निवारण्यासाठी देवस्की :**

५ जानेवारी १७८२ गुराब व गलबते स्वारीस रवाना केली तेव्हा आरमाराची मोडतोड होऊ लागली व लोक आजारी पडायला लागले तेव्हा पूर्णगडच्या बंदरात देवस्की करून ओवाळून काढले.

**पिशाच्च उपद्रवामुळे जखम झाल्याची समजूत (इसवी सन १७८२-८३) :**

देवजी नाईक सेट्या या शिपायास तलवारीची जखम लागली. ही जखम पिशाच्च उपद्रवामुळे लागली अशा समजुतीतून उतारा करून ओवाळून टाकला त्यासाठी १ रुपया खर्च आला.

**जहाजांवरून ओवाळून टाकलेल्या वस्तू (इसवी सन १७६९-७०):**

गलबतावरून किंवा गुराबावरून ओवाळून टाकलेल्या वस्तू - बकरे, कोंबडे, मातीचे मडके, सुपारी, गुळ, हळद, शेंदूर, नारळ.

**मोहोळ शांती** १) जंजिरे मजकूर येथील जामदारखान्यावरील माडीस मधुमक्षिका बसल्या त्यासाठी शांत करून पौष वाद्य नवमीस होम केला. (इसवी सन १७५९-६०) २) गुराब गोदीत असता गुराबेवर मधमाशाची मोहोळ बसली सबब शांत केली. (इसवी सन

१७६९-७०)

वरील सर्व माहितीवरून एक गोष्ट लक्षात येते ती म्हणजे आरमाराकडे विविध कारणांसाठी जसे की, नित्य व्यवहारात छोटी-मोठी संकटे प्राप्त झाली असता किंवा चांगली अर्थप्राप्ती व्हावी यासाठी देवी-देवता, पीर इत्यादींना नवस केले जात असत आणि ते प्रामाणिकपणे फेडलेही जात असत. तसेच भूत, पिशाच्च, करणी इत्यादी गोष्टींनाही तत्कालीन समाजात स्थान होते. यावरून त्या काळात लोकांच्या धार्मिक श्रद्धा, परंपरा काय होत्या, इत्यादींची माहिती जाणून घेण्यास मदत होते.

***

श्री रामेश्वर, मौजे गिरये



सरखेल संभाजी आंग्रे समाधी स्थळ



**प्रकरण ८ :**

# आर्थिक

**आरमाराच्या उत्पन्नाचे स्रोत :**

**१) कर :** आरमार ज्या तालुक्यात असे त्याच्या आसपास असलेल्या प्रदेशातून जमा होणारा वेगवेगळ्या स्वरूपातील कर हे आरमाराच्या उत्पन्नाचे एक साधन होते. हा कर धान्य, इतर वस्तू जसे की, तांदूळ, नागली, दूध, तूप, तेल इत्यादी गोष्टींच्या स्वरूपात गोळा केला जात असे. याशिवाय आरमाराच्या आसपास असलेल्या मिठागरांमधून काही प्रमाणात मिठाची तरतूदही केली जात असे. विजयदुर्ग येथील आरमाराच्या खर्चाच्या तरतुदीसाठी तर्फ सौंदल प्रांत राजापूर हा महाल सरंजामास होता.

**२) स्वारीमधून मिळणारे उत्पन्न :** आरमार स्वारीसाठी जात असे तेव्हा बेकौली जहाजे आणि शत्रूच्या आरमारातील जहाजे पकडून त्यावरील माल जप्त केला जात असे. हे आरमाराच्या उत्पन्नाचे प्रमुख साधन होते. जी बेकौली गलबते, गुराब, डंग्या इत्यादी पकडून आणली जात असत ती आरमाराच्या उपयोगाची असेल तर आरमारात ठेवली जात असत नाही तर व्यापार करणाऱ्या सावकारांना विकली जात असत. तसेच या जहाजांवर असलेल्या मालापैकी आरमाराकडे नित्य वापरासाठी उपयोगी पडणाऱ्या वस्तू जसे की, धान्य, धातूच्या वस्तू, तोफा, बंदुकी व त्यांची दारू, शस्त्रास्त्रे इत्यादी आरमाराकडे ठेवले जात असे. याशिवाय इतर वस्तू जसे की, सुगंधी माल, काच, पितळ, तांबे इत्यादी धातूंच्या वस्तू, भांडी वगैरे लिलाव करून विकले जात असे. उदाहरणादाखल – **इसवी सन १७६१–६२** – या सालात ज्या स्वाऱ्या झाल्या त्यामधून जे उत्पन्न मिळाले त्याचा तपशील – पकडून आणलेली जहाजे इत्यादी : ६ डंग्या मस्कती, साकीन बंदर मंदीले येथील शियारे पुरत्री या इसमाच्या मालकीचे एक तराडे तीरकती (तीन शिडांचे जहाज) ज्याचा कप्तान फयल मनोद हा पोर्तुगीज होता, हवावी गलबत शामलाकडील (सिद्दीकडील), १ कुंजरा ?, ३ मंज्या कामोरी (कामगार घेऊन जाणारी गलबते) उदे कामत नावाच्या इसमाच्या मालकीच्या, इसफरास नावाचा इसम घेऊन जात होता त्या पकडल्या, ३ मचवे पैकी १ लहान २ मोठे होते. मोठ्या मचव्यांपैकी १ मचवा वलंदेजी (डच) तराड्याचा होता. अशी आणि इतर मिळून एकूण

१६ जहाजे पकडून आणली. त्यापैकी १५ जहाजे लिलावात विकून टाकली. या सर्व जहाजांतून मिळालेली रोख रक्कम - १७५ रुपये ८ आणे. जहाजांवरील माल विकला त्यातून २१ हजार ८८२ रुपये १० आणे दोन पैसे मिळाले. ७३ रयाल आणि ३१ अशरफ्या मिळाल्या. सोने, चांदी आणि मोठे व लहान मोतीसुद्धा मिळाले. याशिवाय धान्य ज्यात मूग, मीठ, ज्वारी, तांदूळ, करड, कडवे पावटे, तेल, मसाले, हिंग, गूळ, साखर, सुपारी, आंबसोल, जिरे इत्यादी मिळाले, तसेच सुगंधी माल, द्राक्षे, खजूर, गंधक, तांबे, पतंग, हत्यारे, ढाल, निमचे, इत्यादी मिळाले. **२) इसवी सन १७६७-६८** - यावर्षी डचांची गाफील (गलबत) कोचीहून सुरतेस जात असताना कलीकोटच्या समुद्रावर मराठ्यांच्या आरमाराची गाठ पडली आणि मोठी लढाई झाली. शेवटी आपल्या आरमाराचा विजय होऊन ती गाफील धरून आणली आणि त्यातून बरेचसे सामान जसे की, सोने,चांदी इत्यादींची प्राप्ती झाली. २) कलीकोटचे बंदरात सावकारी तराडी (जहाजे) माल भरीत असताना मराठा आरमाराने जाऊन तराड्याची अडावणी केली त्यावेळेस लढाई झाली. मराठा आरमाराने मर्दुमकी करून तराडी पाडाव करून आणली. ती विजयदुर्गच्या बंदरात गुरुवार १७ मार्च १७६८ रोजी दाखल झाली.

**३) इतर बंदरांतून गोळा झालेली रक्कम :**

विजयदुर्ग व्यतिरिक्त इतर बंदरांमधून गोळा होणारी रक्कम आरमाराच्या उत्पन्नाचा स्रोत होता. उदाहरणादाखल - कल्याण बंदरपैकी अडीच हजार नख्त खलित्यातून आणले. त्यासाठी खलिते शिवणे आणि लखोट्यास लाख लावण्यासाठी खर्च झाला.

**४) वलावा :**

गलबतांचा तांडा सुरक्षितपणे इप्सित स्थळी पोचावा म्हणून आरमाराकडून शिपाई, बरखंदाज वगैरे असलेले गलबत म्हणजेच वलावा घेतला जाई. त्यासाठी ठराविक रक्कम आरमाराकडे भरण्यात येई.

**५) कौलावण आणि दस्तक :**

व्यापारी जहाजांना प्रत्येक वर्षी दस्तक म्हणजेच परवाना घ्यावा लागत असे. त्यासाठी सावकार किंवा व्यापारी काही रक्कम सरकारात भरत असत. नियमित व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांना प्रत्येक वर्षी दसऱ्याला तश्रीफा म्हणून वस्त्रे व थोडीशी नख्त रक्कम भेट दिली जात असे. या जहाजांतून आयात किंवा निर्यात केल्या जाणाऱ्या मालावर प्रती जहाज काही रक्कम कौलावण म्हणून आकारली जात असे. कौलावण म्हणजे समुद्रावरून व्यापार करण्यासाठी सरकारचा

कौल म्हणजेच मान्यता घेणे. याशिवाय कौल घेणाऱ्या जहाजांमध्ये जो माल असेल त्यातील काही माल सरकारला नजर (भेट) म्हणून द्यावा लागत असे. सन १७९३–९४ च्या कागदातून अगदी कराची, मस्कत बंदरांपर्यंतही कौलावण दिल्याचे दिसून येते. पुढे दिलेल्या तख्त्यावरून विजयदुर्ग येथून व्यापारी जहाजांना कोणकोणत्या बंदरांपर्यंत कौलावण दिली जात असे, जहाजांमधून साधारण किती खंडी माल वाहून नेला जात असे आणि त्यासाठी साधारण किती रुपये आकारले जात असत, याची कल्पना येण्यास मदत होईल.

**इसवी सन १७९३–९४ :**

| ज्या ठिकाणापर्यंत कौल दिला त्या बंदराचे नाव | एकूण कौल दिलेली जहाजे | एकूण माल खंडी | एकूण मिळालेले उत्पन्न रुपये |
|---|---|---|---|
| गोवे | ६२ | २३८३ | तीनशे चौऱ्याणव रुपये २ आणे २ पैसे |
| मस्कत | १८ | ३३५८ | पाच हजार चारशे दहा रुपये |
| कराची | २ | ३५८ | पाचशे सत्त्याहात्तर रुपये |
| साटी | ६ | २३६ | सवा एकोणचाळीस रुपये |
| कचमांडवी (गुजराथ) | ९ | १६६८ | दोन हजार सत्त्याऐंशी रुपये ८ आणे |
| सुमेरी | २२ | ८४० | तेराशे एकोणनव्वद रुपये १२ आणे |
| मालवण | १८ | २३१ | चारशे सात रुपये १२ आणे |
| रेडी | ८ | १४० | दोनशे चाळीस रुपये ८ आणे |
| बसनूर | ९ | २५८ | चारशे एकतीस रुपये ४ आणे |
| कारवार | ५ | १२६ | एकवीस रुपये दोन आणे १ पैसा |

| | | | |
|---|---|---|---|
| नवानगर | ३ | ५०७ | आठशे सतरा रुपये ८ आणे |
| कालकोल (कलीकोलन किंवा कैकलन,केरळ) | १ | ३२ | सवात्रेपन्न रुपये |
| तलचिरी (थलशेरी, केरळ) | १ | ३१ | पावणेबावन्न रुपये |
| पोरबंदर (गुजराथ) | १ | १३५ | दोनशे अठरा रुपये |
| असोले | ३ | ११२ | एकशे पंच्याऐंशी रुपये ८ आणे |
| सिवाली | १ | ८ | पंधरा रुपये |
| मिरज (मिरजान, कर्नाटक) | १ | ४० | सहासष्ट रुपये |
| मंगलोर | २ | १८९ | तीनशेसहा रुपये ८ आणे |
| चोपडे | ४ | ४४ | पावणे एकोण ऐंशी रुपये |
| हुनावर | १ | १६ | पावणे अठावीस रुपये |
| कुमठे | १ | २० | चौतीस रुपये |
| बईदखोल | १ | ४० | सहासष्ट रुपये |
| एकूण | १७९ | १०७७२ | १७६०८ रुपये बारा आणे. |

याशिवाय इसवी सन १७७०-७१ च्या कागदपत्रांतून विजयदुर्ग आणि वसई प्रांतांतून किती कौलावण मिळाली, याची माहिती मिळते.

**इसवी सन १७७०-७१ :** कौलावण - एकूण जमा ९२६० रुपये. यापैकी विजयदुर्ग बंदरातून ५७६३ रुपये तर प्रांत वसईमधून ३४९७ रुपये असे एकूण ९२६० रुपये जमा झाले. एकूण जहाजे - सावकारी तराडी, हुलक्या, मचूळ, डंगी, मंजी मिळून एकूण ८२ जहाजे होती.

| | | |
|---|---|---|
| मस्कत | १५ डंग्या | २४०४ खंडी माल |
| गोवा | मचूळ व हूलक्या एकूण मिळून ६५ | ३२५१ खंडी माल |
| आचरे | १ महागिरी | ८ खंडी |
| राजापूर | ४८ मस्कती डंग्या | ४१८३ |

पेशव्यांनी धुळप यांना आरमाराचा सुभा सांगितल्यानंतर आरमाराकडून वर्षाला साधारणपणे किती उत्पन्न सरकारला मिळत असे, याची कल्पना यावी म्हणून एक तक्ता देत आहे.

| | |
|---|---|
| रुद्राजीराव धुळप | इसवी सन १७६१–६२ : दोन लाख ३१ हजार १८० रुपये. |
| | यात एक लाख ४५ हजार ५७५ रुपये ८ आणे रोख जमा झाले होते. |
| आनंदराव धुळप | इसवी सन १७६३–६४ : दोन लाख ५९ हजार ४०३ रुपये ८ आणे २ पैसे. |
| आनंदराव धुळप | इसवी सन १७९४–९५ : दोन लाख ४४ हजार ६७० रुपये २ आणे |
| आनंदराव धुळप | इसवी सन १७९५–९६ : दोन लाख १९ हजार ९८४ रुपये ८ आणे |

**आरमाराचा खर्च :**

**१) आरमाराकडील लोकांचे पगार :**

आरमाराकडे कामाला असणारे लोक जसे की, दर्यासारंग, खलाशी, हशम, बाजेहशम यांचे पगार धान्य आणि काही रोख रक्कम अशा स्वरूपात दिले जात असत.

**२) जहाजांची दुरुस्ती आणि देखरेख :**

आरमारातील जहाजांची दुरुस्ती, देखरेख प्रतिवर्षी करावी लागत असे. त्यासाठी लागणारे सामान आणि ही कामे करण्यासाठी असलेले वेगवेगळे लोक जसे की, लोहार, सुतार, छोटी मोठी कामे करणारे मजूर यासाठी खर्च होत असे.

**३) बक्षीस खर्च (इसवी सन १७६१–६२) :**

१) गलबत फतेलष्कर धड्यावरून घेतेसमयी पर्जन्याने लोक थंडावले सबब बक्षीस म्हणून काळी मिरी, ओवा, तंबाखू दिली. २) आरमार स्वारीसाठी वसईस जाते समयी गुराब साहेबासदर याची काठी जाया झाली, ती सुवर्णदुर्गचे बंदरी सुतारांनी रात्रंदिवस मेहनत करून तयार करून दिली सबब ५ रुपये बक्षीस दिले ३) दास्तानाची (धान्याची) कोठी शिपाई यांनी शाकारली सबब बक्षीस दिले. ४) कृष्णा चांभार दिमत बंदर याने गुराब व गलबताचे नगारे दुसरे चांभार मदतीस आणून आरमार स्वारीस गेले तेव्हा जलदीने तयार करून दिले सबब बक्षीस दिले.

**४) दसरा खर्च :**

विजयादशमीला तोफांची, गुराबांची, जहाजांची पूजा केली जात असे. त्यासाठी खर्चाची तरतूद होती.

**५) तश्रीफा :**

नित्य समुद्री वाहतूक करणाऱ्या सावकारी जहाजांच्या मालकांना वर्षातून तश्रीफा म्हणजेच भेट म्हणून वस्त्रे व नख्त रुपये दिले जात असे. या तश्रीफा बहुतेक वेळा दसऱ्याच्या सणास दिल्या जात असत.

**६) बुडीत खर्च :**

गलबतावरील माल किंवा वस्तू काही कारणाने खराब होत असे जसे की, दारू मीठ धान्य इत्यादी तो बुडीत खर्चात लिहिला जाई. उदाहरणादाखल–गुराब आनंदीवरून जवळपास साडेनव्व्याणव खंडी नागली रत्नागिरीहून विजयदुर्ग येथे आणली होती. ती धक्यावर कामगार लावून उतरवत असताना उधाणाची वेळ होती. त्यामुळे गुराब कलंडली व काही नागली समुद्रात पडली. तसेच गलबत हणमंत वसईस स्वारीस गेले असता वेसाव्याचे समुद्रावरून शामलाने गलबत धरून नेले. याविषयीच्या अनेक नोंदी पुढील एका प्रकरणात दिलेल्या आहेत.

**५) छावणी खर्च :**

पर्जन्यकाळी जहाजांवर छावणी उभारली जात असे त्यासाठी नारळाच्या झावळ्या खरेदी करून वापरल्या जात असत.

**६) प्रासंगिक खर्च :**

वलंदेजी तराडे (डच जहाज) व फिरंगी तराडे (पोर्तुगीज जहाज)

यांची गाठ पडून सरकारचे आरमाराने लढाई भारी केली. समुद्रात तीन दिवस लोकांना अन्न मिळाले नाही. उपवासाने लोक हैराण झाले सबब जहाजांवर असलेल्या मालापैकी १ खंडी पावणे चार मण ८ शेर वजनाचे खजूर, खारीक इत्यादी त्यांना खाण्यास दिले.

**७) देवस्की खर्च :**

आरमार स्वारीस जाते समयी ओवाळून काढण्याचा खर्च, तसेच देवास नारळ व रुमालाचा खर्च होत असे.

**८) इशारती खर्च :**

आरमार स्वारीस असता रात्री चुकामुक होता किंवा भारी वादळ पडता इशारतीबद्दल नळे व चंद्रज्योती वापरत असत.

**९) परीक्षा खर्च :**

नवे लोक कामास ठेवले की, त्यांची नेमबाजीची परीक्षा घेतली जात असे. उदाहरणादाखल गोलंदाज नवा टोपीकर आला त्याजकडून निशाणे मारून पाहावयाबद्दल खर्च झाला (इसवी सन १७६२)

**१०) स्वारी आणि लढाई खर्च :**

आरमाराच्या स्वारीचा आणि स्वारीवर असताना लढाया होत असत त्यासाठी लागणाऱ्या दारूगोळा इत्यादींचा खर्च.

**११) इतर किरकोळ खर्च (इसवी सन १७६३-६४) :**

१) सौंदल महालातील सरकारी जमिनीतील आंबे पाडण्यासाठी जे आसामी होते त्यांना दारू आणि गोळ्या दिल्या. २) दालदी म्हणजे समुद्रकिनाऱ्यावर राहणारे आणि आरमाराकडे काम करणारे लोक यांच्या होड्या आरमारातील जहाजांमध्ये पाणी भरण्यास ठेवलेल्या असत त्याचा खर्च. ३) दर्यावर्दी यांच्या हाताखाली छोटी-मोठी कामे करणाऱ्या लोकांना त्यांची बदली झाली किंवा निवृत्ती होताना बहुमान म्हणून वस्त्रे देण्याचा शिरस्ता होता. ४) जहाजे धड्यावर (किनाऱ्यावर) घेताना व पाण्यात लोटताना व सुमुहूर्ते कामकाजास प्रारंभ करताना देवास नारळ व शेरणीबद्दल (मिठाईबद्दल) खर्च ५) कचेरीतील हिशेबाच्या दप्तराकडे होणारा खर्च ६) बुधवार, २१ जून १७६९ रोजी सुमुहूर्तावर श्रीदेव विठोबाची मूर्ती विजयदुर्ग किल्ल्याच्या पेठेत हरबाजी गंगाधर याने स्थापिली त्यावेळेस तोफेचा १ बार उडविला त्यासाठी खर्च झाला. ७) इसवी सन १७६१-६२ - भिंगाची चित्रे, जडित आरशासहित पुण्याला पेशव्यांकडे गोविंद हरी कारकून यांच्याकरवी रवाना केली. ८) गोदीवर असलेल्या बागेतील माडाची बोंडे उंदीर खातात त्यांना मारण्यासाठी सोमल खरेदी करून वापरत असत. ९) सौंदल महाली चोरांच्या बंदोबस्तास स्वारी रवाना

केली त्यासाठी झालेला खर्च. १०) बंदुका व जंबुरे यांना गंज चढला तो काढून टाकण्यासाठी झालेला खर्च.

वरील माहितीवरून आरमाराच्या उत्पन्नाचे स्रोत आणि खर्चाच्या बाबी, याची कल्पना यायला मदत होते.

***

## धुळपांची समाधी स्थळे









प्रकरण ९ :

# बुडीत

विजयदुर्ग येथील आरमारात नित्याचे व्यवहार करत असताना काही वेळेस छोट्या-मोठ्या नुकसानीच्या घटना घडत असत. जसे की, जहाजे समुद्रात स्वारीवर असताना लढाईच्या वेळेस शत्रूपक्षाच्या हल्ल्यात होणारे नुकसान, बंदरात किंवा जहाजांवर कामे करत असताना होणारे नुकसान इत्यादी. याविषयीच्या ज्या नोंदी कागदपत्रांमधून पाहायला मिळाल्या त्या पुढीलप्रमाणे -

**इसवी सन १७६७-६८ :**

कोठीत असलेल्या फिरंगी लिपीच्या पोथ्या किडीने खाल्ल्या.

**इसवी सन १७७१-७२ :**

**तोफगोळ्याने उडाल्या जहाजावरील वस्तू :** १ ताभान ? पितळी फतेजंग पालावर होते पोर्तुगीजांशी झालेल्या लढाईत तोफगोळ्याने उडोन गेले. तसेच फिरंग्यांसोबतच्या लढाईत नारायण पालावरील १ शिसाचा मुरुद? तोफगोळा लागोन पाण्यात गेला. **तोफ आणि पावडा समुद्रात बुडाले :** रामप्रसाद गुराबावरील १ तोफ बिडी आठ शेरी (बहुदा गोळ्याचे वजन ८ शेराचे) मंगरूळच्या समुद्रावर चीनाई तराड्याची (चिनी जहाजाची) अडावणी केली त्यावेळेस पाण्यात पडून बुडाली. तसेच फतेजंग पालाचा पावडा (नांगर) मंगरूळच्या समुद्रावर नांगर टाकला असता तुटला आणि समुद्रात गेला.

**इसवी सन १७७२-७३ :**

**चिनी जहाजासोबत लढाई :** रविवार, २८ जून १७७२ या दिवशी मराठा आरमाराची चिनी जहाजाशी गोव्याच्या समुद्रावर गाठ पडली आणि लढाई झाली. यावेळेस मराठा आरमारातील जहाजे व चिनी जहाज यांच्या बोडदांची टक्कर झाली. त्यावेळेस दत्तप्रसाद पालावर बरच्या होत्या त्याची कणसे उडून गेली.

**उतराव वाऱ्याने नांगर तुटून बुडाला :** गलबत यशवंतराव उपर स्वारीस असताना उरणच्या समुद्रावर नांगरवाडीस होते त्याच वेळेस उतराव (उत्तरेचा) वारा सुटला त्यामुळे लोयली (लहान नांगर) पाण्यातील खडकास लागून तुटून पाण्यात गेली.

**एक नांगर काढता दुसराही मिळाला :** रविवार २८ फेब्रुवारी १७७३ या दिवशी समशेरजंग पालाचा नांगर वादळामुळे तुटून पाण्यात

गेला. तो काढण्यासाठी सारंग, तांडेल पाण्यात बुड्या मारून शोध करीत असता आंग्रे यांच्या कारकिर्दीत एक पाल नांगरवाडीस असताना ज्ळाले होते. त्याचा नांगर पाण्याच्या आत पाणबुडे यांना दिसला. तो खूप कष्ट करून बाहेर काढला. सबब त्यांना २५ रुपये बक्षीस दिले. यामध्ये राम तांडेल, लक्ष्मण तांडेल, नार तांडेल, रामगण तांडेल, इस्माईल सारंग इत्यादी लोकांचा समावेश होता.

**पंधरा वावे खोल पाण्यात :** फतेजंग पाल उपर स्वारीस असताना सोमवार २२ फेब्रुवारी १७७३ रोजी बोऱ्याच्या समुद्रावर नांगरवाडीस असता वारा, तुफान, वादळ भारी पडले. पालाचा पावडा (मोठा नांगर) तुटून समुद्रात पडला. पावडा काढण्यासाठी सारंग व तांडेल यांनी भरपूर मेहनत करून समुद्रात पंधरा वावे खोल पाण्यात बुडी मारून पावडा काढला सबब बक्षीस दिले. एक वाव म्हणजे पाच हात लांबीचे अंतर.

**४) लाकडे आणण्यास जाता होडीही बुडाली (इसवी सन १७७६-७७) :**

गलबत वावडी स्वारीस असता बोऱ्याचे बंदरी लाकडे तोडून होडीवरून आणताना गलबतानजीक लाकडांसमेत होडी बुडाली त्या समयी कोयताही पाण्यात बुडाला.

**शहाअलीच्या हवेलीवर हल्ला :**

सोमवार २ जुलै १७६४ रोजी शहाअलीच्या हवेलीवर हल्ला करण्यासाठी मराठा आरमार गेले होते त्यावेळेस ज्या ठिकाणी युद्धास उतरले तेथे लढाईच्या धामधुमीत थैला गेला.

**खराब झालेले सामान :**

मंगळवार ३ जुलै १७६४ गलबत फतेलष्कर याजवरील समान खराब झाले ते : १ थैला कल्यातील दारूमुळे कुजला, १० थैल्या तोफांच्या दारूच्या कुजल्या.

**वादळाने तांदूळ वाहून गेला :**

शनिवार ८ सप्टेंबर १७६४ सवाई नावाची लांगबोट यशवंतगडास तांदूळ आणण्यास पाठविली होती. ती तांदूळ भरून परत येत असताना वाटेस मोठे वादळ पडले त्यामुळे समुद्राचे पाणी लांगबोटीत शिरले. त्यामुळे एकूण तांदूळापैकी अडीच शेर तांदूळ वाहून गेला आणि तोटा झाला. तसेच मंगळवार २५ सप्टेंबर १७६४ रोजी गलबतावरून भात (तांदूळ) भरून आणिले परंतु वाटेत वादळ भारी पडले सबब रेवदंडा येथील कोठीत ठेविले.

**वादळाने बुडाली गलबते व बंदुका :**

इसवी सन १७६३-६४ सालात स्वारी उपर गेली होती. परत येते

समयी दर्यात वादळ भारी पडले त्यामुळे गलबते बुडाली. गलबतावरील बंदुका होत्या त्या कुजल्या. सबब त्यांच्या दुरुस्तीसाठी खर्च आला. गलबत खंडेराव पैकी १ बंदूक त्यासाठी कंठ रुप्याचे (चांदीचे) २० आणि गलबत मार्तंडपैकी बंदूक १, कंठ रुप्याचे १३ केले.

**गुराव बुडू नये म्हणून तांदूळ बुडविला :**

साष्टीवरून रामप्रसाद गुराबावर तांदूळ ठेवून आणत असता जयगडच्या समुद्रावर वादळ भारी पडून गुराब बुडू लागली. गुराब बुडू नये म्हणून त्यातील काही तांदूळ पाण्यात सोडून दिला तो एकूण सव्वा खंडी तीन मण.

**वादळाने मचवा वाहून गेला :**

गुराब सवाई वसईहून येतेसमयी वाटेस वादळ पडले गुराब बुडायला लागली तेव्हा गुराबेचा मचवा त्याच्यावर असलेले सागवानी सोटे वाहून गेले. **सिवेश्वरचे लढाईत सुरी आणि दौत गेली** रामाजी सुर्वे दिमत भगवंतराव धुळप याच्याकडील सुरी सिवेश्वरचे लढाईत मोर्चेबंदी करत असता पडली. तसेच गुमास्ता बाबुराव पांडुरंग हेही या लढाईत होते त्यावेळेस त्यांच्याकडील तांब्याची दौत हरवली.

**हजेरी घेता दौत पाण्यात पडली :**

गलबताचे हजेरीस कारकून गेला असता तांब्याची दौत हातातून समुद्रात पडली.

**इसवी सन १७७४-७५ :**

**मलमाचे सामान, बंदुका आणि घड्याळ उडून दर्यात पडले :**

संताजी जाधव तबीब (वैद्य) हा सिवप्रसाद गुराबेवर होता. त्याच्यापाशी सरकारी जिन्नस आणि त्याचे औषधी मलम बनविण्याचे जिन्नस होते. लढाईच्या वेळेस जिन्नस असलेल्या पेटीस तोफगोळा लागून पेटी उडून दर्यात वाहून गेली. याशिवाय बंदुका आणि घटिकायंत्रही (घड्याळ) लढाईत उडून दर्यात पडले.

**कावर गेली माशाबरोबर :**

लोखंडी कावर (पाचर) मासे मारावयाचे रामप्रसाद गुराबवर होते ते गादा मासा (देवमाशाच्या जातीचा एक मोठा मासा) बोडदाजवळ आला त्याला पकडण्यासाठी कावर मारले. कावर ओढून मासा धरायला जाता काठी मोडली आणि कावर माशास अडकून माशाबरोबर समुद्रात गेले.

**वलंदेजांच्या लढाईत बरछ्या गेल्या :**

वलंदेजाच्या लढाईत तोफेचा गोळा लागल्यामुळे रामप्रसाद गुराबावरील बरछ्या टांगून ठेवल्या होत्या, त्या उडून पाण्यात गेल्या.

**मुरुदाची दोरी गेली :**

नारायणप्रसाद पालावरील मुरुदाची? दोरी कुंभारुच्या समुद्रावर पाणी जोखते समयी तुटून पाण्यात गेली.

**माती आणायला जाता कुदळ गेली पाण्यात :**

पाल फतेजंग बोऱ्याच्या बंदरावर असताना पालावरील चूलदानासाठी माती आणण्यास कुदळी देऊन दर्यावर्दी यांना किनाऱ्यालगत पाठीवले होते. ते पगारातून (होडीतून) परत येत असताना पालाच्या बोडदाचा धक्का बसून कुदळ पाण्यात गेली.

**ठिगळ म्हणून लावलेले तांदूळ खराब झाले :**

बुधवार, ८ मे १७८२ रोजी गुराब सिवप्रसाद स्वारीस असताना उजवे बोडदाकडील मालके रांगेची (पठाणावरील दोन्ही बाजूच्या तीन फळ्या) गाबडी (ठिगळ) उपटली गेली आणि पाणी गुराबाच्या आत यायला लागले. गाबडी नवी बनविण्यासाठी बंदरात जाण्याशिवाय पर्याय नव्हता. बंदरात जाईपर्यंत पाणी आत येऊ नये म्हणून एका कापडी पिशवीत तांदूळ भरून गाबडीवर ठेऊन वर तोफेचे गोळे ठेवले तेव्हाच जहाजात पाणी येण्याचे थांबले. परंतु पाणी लागून तांदूळ कुजून गेले.

**गुराबे गोदीत अडकली :**

सोमवार १७ डिसेंबर १७८१ रोजी पाल व गुराबे गोदीतून बाहेर काढत असताना शिवप्रसाद गुराब गोदीच्या तोंडावर येऊन अडकली. ती बाहेर निघावी म्हणून गोदीच्या तोंडाजवळील काही धोंडे फोडत असताना कुदळ दांड्यातून निखळून पाण्यात गेली.

**जहाज गोदीतून बाहेर काढता वल्ह्याचे पाते गेले :**

गुरुवार १७ डिसेंबर १७८१ या दिवशी नारायण पाल, मौजे गिरये येथील गोदीतून बाहेर काढत असताना अलाथ (वल्ह्याचे पाते) तुटून चिखलात गेली.

**देवगडच्या समुद्रावर मचवा गेला :**

गुरुवार, ९ मे १७८२ रोजी गुराब रामप्रसाद व शिवप्रसाद व ४ गलबते यावर्षीच्या पहिल्या स्वारीस हेट रवाना केली होती. देवगडच्या समुद्रावर उतराण वारा भारी पडून गुराब रामप्रसाद याच्या पागेस (पाग म्हणजे गलबताच्या पिछाडीस बांधलेली दोरी) मचवा होता तो पाग तुटल्यामुळे दर्यागर्क झाला.

**भाड्याचे गलबत फुटले आणि तांदूळ बुडाले (इसवी सन १७७०-७१) :**

सरकाराकडून आरमाराच्या बेगमीसाठी तांदूळ दिला होता तो

गोरेगाववरून नोरी शिबाड म्हणजेच भाड्याच्या गलबतावरून निघाला. शिबाड खाडीतून बाहेर निघताना खराबेयावर (खडकावर) लागून फुटली त्यावेळेस जवळच्याच गावातून मजूर आणून तांदूळ बाहेर काढले. त्यापैकी काही तांदूळ पाण्यात वाहून गेला.

**होकायंत्र फुटले (इसवी सन १७८१-८२) :**

कळंबी काठीचा कपा (कप्पी म्हणजेच पुली) मालमी होक्यावर (होकायंत्रावर) पडला त्यामुळे होका फुटला.

**फाणस कंद्यांची भिंगे निखळली :**

फाणस कंदे म्हणजे कंदील गुराबांच्या छतावर होते. त्याची भिंगे निखळून जाया झाले. या कंदिलांच्या काचा भिंगाच्या आणि बिलोरी असत. बिलोरी म्हणजे स्फटिकासारखी एक प्रकारची काच ज्यातून प्रकाश आरपार गेल्यास सप्तरंगी प्रकाश दिसत असे.

**समई फुटली :**

मातीची समई नारायण पालाच्या छतास होती ती फुटली.

**गरूड गलबताचा नांगर पाण्यात गेला :**

गलबत गरूड स्वारीस असता आचऱ्याचे समुद्रावर वादळ पडल्याने लोयली (छोटा नांगर) खडकास घासून पाण्यात गेली.

**मुरुद गोळा गेला :**

मुरुद गोळा? शिशाचा समशेरजंग पाल स्वारीस असता पाणी जोखते समयी तुटोन पाण्यात गेला.

**तोफ फुटली अन् तोफगोळे उडून गेले (इसवी सन १७९३-९४) :**

या वर्षी कुलाब्यावर स्वारीसाठी आरमार गेले होते त्यावेळेस मारगिरी करत असताना गुराब दर्यादौलतच्या नाळीवरील तोफ फुटली आणि स्फोट झाला त्याने तोफेजवळ ठेवलेले तोफगोळे इत्यादी सामान उडून गेले.

**दगडी जाते तुटले (इसवी सन १७९३-९४) :**

विजयदुर्ग येथील दर्या सदरेत दगडी जाते होते ते भिंतीचा दगड पडून फुटले.

***

प्रकरण १० :

# अयाल बायका बालपरवेशी (इसवी सन १७६७-६८)

अयाल बायका म्हणजे विधवा स्त्रिया आणि बालपरवेशी म्हणजे लढाईत मृत्यूमुखी पडलेल्या सैनिकांच्या कुटुंबांतील मुलांच्या संगोपनाचा खर्च सरकारातून दिला जात असे. आंग्रेंच्या घराण्याच्या कारकिर्दीत जे शिपाई वेगवेगळ्या लढायांमध्ये मृत्यू पावले होते त्यांच्या विधवा स्त्रिया आणि त्यांची मुले विजयदुर्ग येथील पेठेत राहत होती. त्यांना बालपरवेशी सरकारातून दिली जात असे. आरमार पेशव्यांच्या ताब्यात आल्यावरही हा खर्च पेशव्यांनी चालूच ठेवला. यामध्ये स्त्रियांना लुगडे, शेला, तिवट (कापडाचा एक प्रकार) आणि काही मण तांदूळ, नागली इत्यादी धान्य देण्यात येत असे. थोडक्यात सांगायचं झालं तर ज्याप्रमाणे आजच्या काळात देशासाठी लढताना बलिदान दिलेल्या सैनिकांच्या कुटुंबाला पेन्शन दिली जाते, त्याचप्रमाणे मराठा कालखंडात सरकार कामावर बलिदान दिलेल्या सैनिकांच्या कुटुंबीयांच्या उदरनिर्वाहाची काळजी मराठा राज्यकर्ते घेत असत. या सैनिकांची, त्यांच्या स्त्रियांची नावे आणि कोणत्या लढाईत हे सैनिक धारातीर्थी पडले याची माहिती देणारा एक तख्ता मोडी कागदपत्रांतून आढळून आला; तो जसाच्या तसा इथे दिलेला आहे -

| सैनिकाचे नाव | कोणत्या लढाईत ठार झाला | कुटुंबाची माहिती - बायका-मुलांची नावे |
|---|---|---|
| मोराजी महकर | पेंडूरास ठार | भागीरथी |
| धोंडजी साळोखे | अंजनवेलच्या लढाईत ठार | रखमा |
| बावाजी सिंदा | कुलाब्यास ठार | जानकी |
| गणोजी खुंडकर | कुडाळास ठार | जानकी |
| अंबाजी संकपाळ | रत्नागिरीस ठार | अन्नपूर्णा |
| मानाजी पवार | समुद्रावर ग्यालीवरील लढाईत ठार | लक्ष्मी |
| रामजी काळे | यशवंतगडास ठार | जानकी |
| सूर्याजी पाग | ममसुद्यास ठार | सावित्री |
| जानोजी सिंदा | संभू पालावर जळोन मेला | रखमा |

| | | |
|---|---|---|
| बापुजी सिंदा | भरतगडावर ठार | पार्वती |
| अर्जोजी धुमाळ | यशवंतगडावर ठार | रखमा |
| कृष्णाजी पवार | फ्रेंचांविरुद्धच्या लढाईत ठार | बायकोने अग्नीप्रवेश केला. आई काशीबाई |
| गोदजी भोंड | ? | भागीरथी |
| गोदजी जाधव | अंजनवेलीस ठार | लक्ष्मी |
| देवजी भांडा | बोखऱ्यास ठार | गुणाई |
| बाजी भावे | भरतगडावर ठार | पार्वती |
| भिकाजी राउत | इंग्रजी ग्यालीवर ठार | सावित्री |
| कृष्णाजी भोईर | साहेबासदर गुराब त्या लढाईत ठार | कमलाई |
| येसजी पेडणेकर | सवाई गुराबेवर ठार | रत्नाई |
| नागोजी पडवळ | कर्नाटकात हुनावरचे स्वारीस ठार | जानकी |
| दादजी आंबरेकर | सिदगडास ठार | पार्वती |
| कानोजी मांजरेकर | वलंदेजी तराड्यावर ठार | भागीरथी |
| सावजी असवलकर | वलंदेजी तराड्यावर ठार | गंगाई |
| बापुजी जैतापुरकर | भरतगडास ठार | बायको लक्ष्मी, पोटी पोरगा थोर आहे तो |

| | | |
|---|---|---|
| | | देशांतरास गेला. |
| भानजी मयेकर | इंग्रजी तराड्यावर ठार | कमलाई |
| गणोजी तारकर | महिमतगडास ठार | सावित्री |
| देवजी सिरसेकर | भरतगडास ठार | बायको काशीबाई, दोन मुले– तुळाजी वय १०, गोपाळ वय १२ |
| येसजी सागवेकर | वलंदेजी तराड्यावर ठार | जानकी |
| देवजी तारकर | मसुऱ्यास ठार | सावित्री |
| राम तांडेल मालवणकर | कुलाब्यास ठार | रत्नाई |
| भान तांडेल बागुला | इंग्रजाने गुराब धरून नेली त्यावर होता. तिथेच मयत झाला | माकाई |
| कान तांडेल गिरकर | सुवर्णदुर्गास ठार | लक्ष्मी |
| राम तांडेल पेंडलकर | खारेपाटणास ठार | जानकी |
| नारू भाटकर | खारेपाटणास ठार | बायको रत्नाई, मुलगा वय ११ |
| येसू मणचेकर | इंग्रजाने गुराबे नेली ते समयी ठार | मालाय |

| | | |
|---|---|---|
| जान तांडेल सागवेकर | वलंदेजी तराड्यावर ठार | भागीरथी |
| भान तांडेल धुरी | कलीकोटास ठार | जानकी |
| कृष्णा कोइंडा | विजयदुर्गी सरकारचे मोहिमेत संभू पालावर ठार झाला. | रखमा |
| नार तांडेल मोंडकर | अंजनवेलीस ठार | रखमा |
| नाग तांडेल साद्या | शेखोजी आंग्रे यांच्या कारकिर्दीत ठार | कमलाई |
| गोद तांडेल पोसम | संभाजी आंग्रे यांच्या कारकिर्दीत सडका ? मारिल्या ते समयी ठार | लक्ष्मी |
| देमू टकला | यशवंतशाई गुराबेवर ठार | बायको जानकी |
| हरी टकला | कुलाबेवर ग्यालीवर ठार | रखमा |
| अंतु बापकर | संभाजी आंग्रे याचे कारकिर्दीत तराड्यावर पडला | रामाय |
| यैसू तारकर | गुराब इंग्रजाने नेली ते समयी ठार | रखमा |
| माया जुवेकर | कुलाब्यास ग्यालीवर ठार | कमलाई |

| | | |
|---|---|---|
| कृष्ण तांडेल मोडकर | तुळाजी आंग्रे यांच्या कारकिर्दीत ठार | बायको रखमा, मुलगी १२ वर्षे |
| धान तांडेल साद्या | शेखोजी आंग्रे यांच्या कारकिर्दीत इंग्रजी ग्यालीवर ठार | गंगाई |
| धोंड तांडेल साद्या | हुनावरास ठार | सावित्री |
| शेख आदमगिरकर | सुदामनगिरीस ठार | बायको दोन वर्षांपूर्वी मेली आई सुलतानी म्हातारी आहे |
| शेख इनीस | भरतगडास ठार | फातिमा |
| सेख आदम आचरेकर | खारेपाटणास ठार | वलीमजी |
| सेख आदम सरदार | संभाजी आंग्रे यांच्या वेळेस इंग्रजांचे लढाईत ठार | फातिमा |
| इसमाल भालदार | रत्नागिरीत मर्दुकी करून ठार | दोन बायका एकीचे नाव हवा तिला २ मुले हसन १३ वर्षांचा हुसेन १० वर्षांचा, दुसरीचे नाव ठाऊक नाही. |

| | | |
|---|---|---|
| ममद सारंग | सुदामनगरीस ठार | जुलेखा |
| याकुब सारंग | सवाई गुराबेवर वलंदेजी लढाईत ठार | सकीना |
| इसाक गिरकर | येशवंतशाही गुराबेवर ठार | फातिमा |

आंग्रे यांच्या कारकिर्दीत मराठा आरमारातील ज्या अपरिचित वीरांनी आपल्या प्राणांची आहुती दिली, त्याची माहिती वरील तख्त्यातून मिळते. या सर्व वीरांना मानाचा मुजरा!

***



## धुळपांची समाधी स्थळे



प्रकरण ११ :

# मोहीम उंदेरी आणि काशा (पद्मदुर्ग) : इसवी सन १७५९-६०

इसवी सन १७५९-६० मध्ये मराठा आरमाराने उंदेरी आणि काशावर (पद्मदुर्गवर) चढाई केली होती. खुश्कीच्या म्हणजेच जमिनीच्या मार्गाने आणि विजयदुर्गवरून समुद्रमार्गाने आरमार पाठविले आणि या दोन्ही जलदुर्गांवर हल्ला केला गेला. याविषयी पेशवे दप्तर खंड २४ आणि काव्येतिहास संग्रह पत्रे आणि यादी यामध्ये दोन-चार पत्रे प्रकाशित आहेत. तसेच, या पत्रांवर आधारित मजकूर 'रियासत'कार गो. स. सरदेसाई लिखित 'मराठी रियासत खंड ४' मध्ये प्रकाशित आहे. मराठी रियासत खंड ४ मध्ये सरदेसाई यांनी छ १० जमादिलाखर म्हणजेच सोमवार २८ जानेवारी १७६० रोजी उंदेरी आणि २१ फेब्रुवारी १७६० रोजी काशा म्हणजेच पद्मदुर्ग किल्ला मराठ्यांनी जिंकला, असे विधान केलेले आहे. यापैकी उंदेरी किल्ला जिंकला, हे विधान बरोबर आहे. उंदेरी मराठ्यांच्या ताब्यात आला त्यावेळेस उंदेरीकर कोळी यांना तश्रीफा म्हणजेच भेटी दिल्या असा उल्लेख विजयदुर्गच्या कागदपत्रांतूनही येतो; परंतु छ १० जमादिलाखर रोजी सोमवार, २८ जानेवारी १७६० ही तारीख नसून मोडक जंत्रीनुसार छ १० जमादिलाखर रोजी मंगळवार, २९ जानेवारी १७६० ही तारीख येते. तसेच, विजयदुर्गचे मोडी कागद पाहिल्यावर २९ जानेवारी रोजी किल्ला मराठ्यांनी जिंकला किंवा नाही, हे मात्र ठामपणे म्हणता येणार नाही. कारण विजयदुर्गच्या मोडी कागदपत्रांतून उंदेरीवर १७ फेब्रुवारीपर्यंत हल्ला चालू होता, अशा नोंदी आढळून येतात. याचाच अर्थ उंदेरी किल्ला मराठ्यांनी छ १० जमादिलाखर म्हणजेच २९ जानेवारी १७६० रोजी जिंकला, असे ठामपणे म्हणता येत नाही. उंदेरी नेमका कोणत्या तारखेला ताब्यात आला, हेही समजून येत नाही. उंदेरी किल्ला २९ जानेवारी रोजी जिंकला, हे विधान करताना रियासतकारांनी जे संदर्भ दिलेले आहेत, ते संदर्भ पाहिले असता उंदेरी २९ जानेवारी १७६० रोजी मराठ्यांनी जिंकला, हे कुठेही स्पष्ट होत नाही. याशिवाय संदर्भ म्हणून वापरलेल्या पत्रांतून काशा किल्ला जिंकला असेही कुठे

स्पष्ट होत नाही. काव्येइतिहास संग्रह पत्रे व यादी यातील लेखांक १८२ च्या श्रीमंत नानासाहेब पेशवे यांच्या २२ फेब्रुवारी १७६० च्या पत्रात काशावर हल्ला करून काशा ताब्यात घ्यावा, अशा आशयाचा मजकूर आहे; परंतु किल्ला जिंकला, असे कुठेही नमूद केलेले नाही. शिवाय या दोन्ही किल्ल्यांवर केलेल्या मोहिमेविषयी तारीखवार नोंदी विजयदुर्गच्या कागदपत्रांतून आढळून येतात. त्यानुसार १७ एप्रिल १७६० पर्यंत काशावर मराठ्यांचा हल्ला चालूच होता; परंतु ज्याप्रमाणे उंदेरी मराठ्यांनी जिंकला असे कागदपत्रांतून आढळून येते त्याप्रमाणे काशा जिंकला, अशी कोणतीही नोंद आढळून आली नाही. त्यामुळेच काशा ऊर्फ पद्मदुर्ग मराठ्यांच्या ताब्यात आला किंवा नाही, याविषयी ठामपणे प्रतिपादन करणे अवघड आहे.

उंदेरी आणि काशाची मोहीम मराठा आरमाराने चालविली. या मोहिमेच्या वेळेस विजयदुर्ग येथील सुभेदारी नारो त्रिंबक यांच्याकडे होती. प्रत्यक्ष लढाईच्या वेळेस जे सरदार नेतृत्व करीत होते त्यात प्रामुख्याने रुद्राजीराव धुळप यांचा उल्लेख येतो. विजयदुर्गच्या मोडी कागदपत्रांतील विस्तृत नोंदीवरून जवळपास दोन ते तीन महिने चाललेल्या या मोहिमेत रोज घडणाऱ्या घटनांची, मोर्चेबंदी कशाप्रकारे केली याची, हल्ल्याचे तंत्र इत्यादी अनेक गोष्टींची माहिती मिळते. यावरून मराठा सैन्याची दीर्घकालीन चालणारी युद्धमोहीम कशा पद्धतीने होत असे आणि एखाद्या जलदुर्गावर हल्ला करण्यास मराठा आरमार ज्यावेळेस जात असे, त्यावेळेस युद्धाच्या ठिकाणी काय प्रकारच्या घडामोडी घडत असत, शस्त्रास्त्रे कोणकोणती वापरली जात असत, मोहिमेवर असताना जेवणखाण कशापद्धतीने होत असे, श्रमपरिहारासाठी सैन्याला खाण्यापिण्याच्या कोणत्या वस्तू दिल्या जात असत इत्यादी अनेक गोष्टींची माहिती मिळण्यास मदत होते.

**मोर्चेबंदी उंदेरी :**

उंदेरीवर खुश्कीच्या (जमिनीच्या) मार्गाने मोर्चा लावून व आरमारावरून आणि किल्ल्यानजीक खडक टापूवर मोर्चा लावून हल्ला केला. यावेळेस विजयदुर्ग येथून जे जे सामान पाठविण्यात आले आणि प्रत्यक्षात हल्ल्याच्या वेळेस घडलेल्या घटनांच्या तारीखवार नोंदी पुढीलप्रमाणे

**२४ डिसेंबर १७५९ सोमवार** – मोर्च्यात कणगे (बांबूचा आडोसा) आणि ते बांधण्यास सुतळी पाठविली.

**२७ डिसेंबर १७५९, गुरुवार** – उंदेरीस हल्ला करण्यासाठी शिड्या तयार केल्या त्यासाठी मालदीवी काथा वापरला.

**२९ डिसेंबर १७५९ शनिवार** – १ रुपयाची ७००० विड्याची

पाने पाठविली, तसेच वासुदेव राम यांच्याकडे ओवा, मिरी, कांदे, गूळ, तंबाकू आणि शिड्या बांधण्यासाठी सरस, मालदीवी काथा आणि रंग इत्यादी वस्तू पाठविल्या गेल्या.

**३० डिसेंबर १७५९ रविवार** – मोर्च्यात पाण्यासाठी मातीच्या घागरी पाठविल्या याशिवाय बालाजी अनंत वेलणकर यांच्याकडे फुटाणे, कांदे, तंबाखू इत्यादी पाठविले. लढाई करून थकलेल्या फौजेला श्रमपरिहार म्हणून गूळ पाणी, कांदे देत असत. डिसेंबर–जानेवारी हे महिने थंडीचे असल्याने फौजेतील लोक थंडीने बेजार झाले होते. थंडीपासून बचाव व्हावा म्हणून त्यांना ओवा, काळी मिरी, तंबाखू, सुपारी इत्यादी पाठविले गेले. तसेच जेवणाच्या पाट्या पाठविल्या गेल्या.

**३१ डिसेंबर १७५९, सोमवार** – रुद्राजीराव धुळप आणि त्यांच्या तुकडीतील लोक खडकावर मोर्चा लावून होते. त्यांना जेवणासाठी डाळ, तूप इत्यादी वस्तू पाठविल्या. तसेच खासबारदार यांना जामगीचे दोर (बत्ती देण्यासाठीची दोरी), गूळ व कांदे इत्यादी पाठविले गेले. उंदेरीनजीक जाऊन मारगिरी करण्याकरिता साहेबासदर गुराबावर कंदिलात लावण्यासाठी मेणवाती दिल्या. तसेच मोर्च्यातील लोकांसाठी येसजी वरेकर खासबारदार याच्याकडे तंबाकू दिली.

**३ जानेवारी १७६० गुरुवार** – कुलाब्याकडील सैनिक मोर्चात होते त्यांना पाण्याच्या घागरी पाठविल्या.

**४ जानेवारी १७६०, शुक्रवार** – मोर्चेबंदीतील लोकांना जेवणासाठी १० कोंबड्या, पीठ, तांदूळ पीठ, मध, धणे, तेल, कांदे, लसूण, हळद, तूप इत्यादी पाठविले.

**८ जानेवारी १७६०, मंगळवार** – मोर्च्यातील लोकांना जेवणासाठी २ रुपयांचे बोंबील पाठविले.

**९ जानेवारी १७६० बुधवार** – पुन्हा जेवण पाठविले आणि मोर्चात कणगे भरण्यासाठी जे थैले केले होते त्यासाठी सुतळी, चराट (दोर) पाठविले. तसेच बत्तीस हात मापाची ३६ सनगे (कापड) पाठविली.

**१० जानेवारी १७६० गुरुवार** – खडक टापूवर मोर्चे घातले तेथे बंदिस्त आडोसा करण्यासाठी कणगे भरले. तसेच कापडी थैल्यात माती भरून बंदिस्त आडोसा केला. त्यासाठी बत्तीस हात मापाच्या १७ सनगांचे (कापड) ५६४ हात कापड वापरून एकूण ३३६ खलिते (पिशव्या) तयार केले.

**११ जानेवारी १७६० शुक्रवार** – खडक टापूवरील मोर्चात असलेल्या लोकांना लढाई करताना दुखापत झाली तर अंगाला

लावण्यासाठी गोडे तेल आणि जेवणासाठी तांदूळ, पीठ व पाण्यासाठी घागरी पाठविल्या.

**१२ जानेवारी १७६० शनिवार –** पुन्हा जेवणाचे सामान पाठविले.

**१३ जानेवारी १७६० रविवार** – मोर्च्यातील लोकांस ४ रुपयाचे मासे व बोंबील पाठविले आणि मोर्च्यात २० दर्यावर्दी आसामी रवाना केले.

**१४ जानेवारी १७६० सोमवार –** जेवणे पाठविली. तसेच मोर्चेबंदीवर कणगे बांधण्यासाठी ८०२ कापडी थैले पाठविले. त्यासाठी १३१४ हात इतके कापड वापरले. याशिवाय थंडीसाठी तंबाकू पाठविली.

**१५ जानेवारी १७६० मंगळवार –** मोर्च्यातील लोकांस बादरी (धातूची तार) खरेदी ऐवजी ५ रुपये पाठविले.

**१६ जानेवारी १७६० बुधवार –** फराळासाठी फुटाणे, हरभरे आणि जेवणाचे सामान पाठविले तसेच मोर्च्यातील तोफा मारण्यासाठी लागू केल्या, त्या वेळेस खडपावरील देवास व पिरास नारळ, आणि बकरी दिली.

**१८ जानेवारी १७६० शुक्रवार –** आबाजी पाटील कुलाबकर याने जेवणाचे समान पाठविले.

**१९ जानेवारी १७६० शनिवार** – मोर्च्यातील लोकांस ४ रुपयांचे बोंबील, २ रुपयाची विड्याची पाने ८००० आणि जेंजालदार यांना फराळ पाठविला. तसेच दत्तप्रसाद गुराब आणि इतर जहाजांवरील कंदिलांत लावण्यासाठी मेणवाती वापरल्या.

**२० जानेवारी १७६०, रविवार** – जेवण पाठविले. रामजी पाटले याच्याकडील जेंजालदारांना सामान पाठविले. तसेच आपाजी नरसी हशमनिस याच्याकडे दिवटीबद्दल कडू तेल पाठविले.

**२१ जानेवारी १७६०, सोमवार –** उंदेरी खडपावर मोर्चा लावण्यास कापसाचे गठ्ठे लावले, त्या गठ्ठयांच्या लागवडीस खादी कापड एकूण १२० हात वापरले. तसेच बरखंदाज यांच्या बंदुकी मोडल्या त्या नीट करण्यास सामान पाठविले.

**२८ जानेवारी १७६०, सोमवार –** कुबाजी माडे कुलाबकर मोर्च्यात होता त्याला विड्यास सामान दिले. तसेच येसजी तलेकर खासबारदार याची सुरी उंदेरी टापूच्या मोर्च्यात हरवली सबब त्याला सुरीऐवजी लोखंड व पोलाद दिले.

**३० जानेवारी १७६०, बुधवार** – सुजीकर्ण जेंजालदाज याची बंदूक जाया झाली त्याच्या दुरुस्तीस लोखंड दिले.

**२ फेब्रुवारी १७६०, शनिवार** – उंदेरीच्या खडक टापूवर आडोशासाठी कापसाचे गठ्ठे वापरून मोर्चा बंदिस्त केला होता. उंदेरीतून तोफांचा मारा झाला त्यामुळे काही कापूस उडून गेला आणि काही कापूस समुद्राचे पाणी लागल्याने कुजला.

**३ फेब्रुवारी १७६० रविवार** – मोर्च्यातील कणगे भरण्यासाठी राजश्री रामाजी महादेव सुभेदार यांच्याकडून चराटे घेऊन खलिते (पिशव्या) केले.

**१२ फेब्रुवारी १७६०, मंगळवार** – मोर्च्यावर तोफा नेल्या त्याच्या जामगीसाठी सुत दिले.

**१३ फेब्रुवारी १७६०, बुधवार** – उंदेरी येथील मोर्च्यावर मारामारीस तोफ लागू केली तेव्हा शेरणीबदल २ नारळ दिले.

**१७ फेब्रुवारी १७६०, रविवार** – उंदेरीवर मारगिरी गरनाळ तोफेतून केली त्यासाठी दारू अर्धा खंडी, सव्वा चार मण आणि ६ पायली इतकी वापरली. तसेच खडकटापूवरून गरनाळीचे ५९ गोळे जंजीऱ्यात टाकले. त्यापैकी ५२ बिडी गोळे आणि ७ खापरसुती (मडक्याचे) होते. या गरनाळ तोफा टोणग्यावर ठेवलेल्या होत्या.

**उंदेरी फत्ते झाला :** उंदरी फत्ते झाल्यानंतर उंदेरकर कोळी यांना तश्रीफा (भेटी) दिल्या.

उंदेरीनजीक खडकावर मोर्चेबंदी केली त्यास सामान – शिसे, २७ सोटे सागवानी (लाकडाचे ओंडके) बसविले त्यास काथ्या व बुच, कणग्यासाठी (बांबूचा आडोसा) ६३ थैले बारदाने, २१ थैले चर्मी, १ लाकडी पेटी, ३१५ झाप कणग्याबद्दल.

याशिवाय लढाई संपल्यानंतर में आणि जून महिन्यातील नोंदींमध्ये लढाईशी संबंधित मजकूर आढळून येतो.

**रविवार ४ मे १७६०** – खडकटापूवर रुद्राजीराव धुळप आणि त्यांचे लोक होते त्यांना गुळ, तूप, सुपारी इत्यादी.

**३ जून १७६०, मंगळवार** – उंदेरीस मोर्चेबंदी केली त्यावेळेस कापसाच्या गठ्ठ्यास बारदाने वापरली होती ती बारदाने व कापूस कुजून जाया झाला. तसेच गलबत शाहतीर उंदेरीच्या हल्ल्यास गेले तेव्हा एकूण ७ रुपये खर्च झाल्याचा उल्लेख आहे. परंतु हा खर्च कशासाठी झाला त्याचा उल्लेख नाही. याच दिवशीच्या दुसऱ्या एका नोंदीत मोर्चावर जेवणासाठी जे सामान पाठविले जाई त्याची नोंद आहे. त्यात तांदूळ सडिक, गव्हाचे पीठ, भात (तांदूळ), पोहे, तूप, तंबाकू, गोडे तेल, साखर, गूळ, मसाला, विड्याची पाने, कोंबडी, नारळ आणि पाण्यासाठी मातीच्या घागरी पाठविल्याचा उल्लेख आहे. तसेच श्रमपरिहार म्हणून गूळ पाणीही दिले.

**मोहीम किल्ले काशा (पद्मदुर्ग) –**

**फेब्रुवारी १७६० :** या महिन्यात काशावर हल्ला करण्याठीची तयारी चालू झाली.

**शनिवार ९ फेब्रुवारी १७६० :** बरखंदाजी व गरनाळीचे मारगिरीबद्दल दारू पाव मण ६ शेर, गरनाळ गोळे बिडी २ (कासीमबेग गोलंदाज)

**सोमवार ११ फेब्रुवारी १७६० :** काशावर मारगिरीस दारू ८ पायली प्रती बार गोळा १, इंग्रज गोलंदाज एकूण ४ गोळे तोफी व गरनाळी थोर बिडी १ लहान बिडी १

**१३ फेब्रुवारी १७६०, बुधवार –** काशावर हल्ला करण्यासाठी शिड्या तयार केल्या त्या बांधण्यासाठी आगरी काथ्या आणि लोखंडी खिळे खरेदी केले. तसेच हिलालासाठी अर्धा मण ४ पायली कडू (कच्च्या) तेलाची तरतूद केली गेली.

**गुरूवार १४ फेब्रुवारी १७६० :** काशावर जोरदार हल्ला केला. दारू पाऊण खंडी अर्धा मण ७ पायली गोळे ३३ पाऊण खंडी पावणेचार मण ५ पायली, गोळे २८ एकूण गोळे ६१

**शनिवार १६ फेब्रुवारी १७६० :** काशावर मारगिरी करण्यास विसाजी नारायण याला दारू सव्वा एकसष्ट खंडी आणि बंदुकीच्या ४०० गोळ्या दिल्या.

**१७ फेब्रुवारी १७६०, रविवार –** गरनाळीच्या बारास अर्धा मण दारू व ५ साधे गोळे, ५ खापरसुती गोळे वापरले. तसेच याच दिवशी २८ खासबारदार काशाच्या लढाईसाठी रवाना केले. त्यांना बरखंदाजीकरिता पाऊण मण, ८ पायली दारू आणि ३०४ बंदुकीच्या गोळ्या दिल्या.

**१८ फेब्रुवारी १७६०, सोमवार –** या दिवशी रात्रीच्या वेळेस विजयदुर्ग येथील गलबतांवर लढाईचे सामान चढविले गेले. हे काम मजुरांनी रात्रीच्या वेळेस केले. काम करताना मजुरांना तंबाखू दिली. तसेच दारू ८ पायली, गरनाळी गोळे खापरसुती सुमारे २ दिले.

**२६ फेब्रुवारी १७६०, मंगळवार –** या दिवशी मराठा सैनिक दिवसाच्या दोन प्रहरी, किनाऱ्याने लपत छपत जाऊन किल्ल्यानजीक जाऊन मारा करून परत आले. परत आल्यावर श्रमपरिहारासाठी त्यांना गूळपाणी आणि कांदे दिले.

**१ मार्च १७६०, शनिवार –** आपाजी नरसी याला हिलालासाठी कडू तेल दिले.

**३ मार्च १७६०, सोमवार –** किले काशाच्या हल्ल्यास ज्या गलबतांवरून आणि गुराबांवरून लोक गेले त्या जहाजांवर जे मुख्य

सारंग होते त्यांच्याकडे इशारतीसाठी पाऊण पायली (साधारण अडीच किलो) वजनाच्या मेणवाती आणि १५ चंद्रजोती दिल्या.

**४ मार्च १७६०, मंगळवार** – मोर्च्याकडे खासबारदार, बाजे हशम यांना रवाना करताना मशालीसाठी तेल दिले. तसेच सोलकी (संच) बांधण्यासाठी महमद खान याच्याकडे आगरी काथा दिला.

**६ मार्च १७६०, गुरुवार** – या दिवशी सेखोजी नाईक साटम याच्याकडे हिलाल इत्यादीसाठी तेल दिले.

**८ मार्च १७६०, शनिवार** – खासबारदारांच्या सुऱ्या खडकावरील मोर्चावर असताना गेल्या. मोबदला म्हणून नवीन सुऱ्या करून दिल्या.

**१३ मार्च १७६०, गुरुवार** – या दिवशी दोन मेणवाती १ पायली वजनाच्या (साधारण साडेतीन किलो) आणि ३ चंद्रजोती दिल्या. तसेच जमाल महमद याला तंबाखू दिली.

**१९ मार्च १७६०, बुधवार** – मोर्चेबंदीत व आरमाराकडे जाता येताना रात्री दिवटीबद्दल आपाजी नरसी याला गोडे तेल दिले.

२० मार्च १७६०, गुरुवार – आबाजी पाटले याचे पायताण लढाई करताना गेले सबब नवीन पायताणास चामडे दिले.

**२३ मार्च १७६०, रविवार** – काशावर हल्ला करण्यासाठी माहागिऱ्या पाठविल्या त्यांना उजेडासाठी ६ चंद्रजोती दिल्या. तसेच राजश्री आबासाहेब ? यांच्याकडील खिजमतगार ज्या महागिरीवर होते त्यावर पाण्यासाठी दोन घागरी आणि चार मडकी दिली.

**२७ मार्च १७६०, गुरुवार** – रुद्राजीराव धुळप यांच्या बंदुकीचा खजन (बंदुकीच्या कान्याजवळचा भाग) जाया झाला आणि आपाजी गायकवाड याची बंदूक हल्ल्यात जाया झाली ती नीट करण्यास लोखंड दिले.

**२९ मार्च १७६०, शनिवार** – मोर्चाच्या इशारतीबद्दल ३ चंद्रजोती वापरल्या.

**१ एप्रिल १७६०, मंगळवार** – गलबते छबिन्यास (गस्तीस) जातात त्यावर इशारतीसाठी ५ चंद्रजोती दिल्या.

**१० एप्रिल १७६०, गुरुवार** – फिरंग्यांचे सामान रात्री उतरवले त्यावेळेस दिवटी, हिलालाबद्दल कडू तेल दिले. तसेच रुद्राजी धुळप आणि आपाजी नरसी यांच्याकडे कडू तेल दिले.

**१३ एप्रिल १७६०, रविवार** – गुराबांवर आणि मोर्चावर लावण्यास ५ चंद्रजोती दिल्या.

**१६ एप्रिल १७६०, बुधवार** – काशावर मारा करण्यासाठी मोर्चा लावण्यास आगरी कथा आणि लोखंड इस्माईल याच्याकडे दिले.

काशावर तोफांची मारगिरी केली त्याचा तपशील :

**१९ फेब्रुवारी १७६०, मंगळवार –** ३ तोफगोळे व दीड मण ५ पायली दारू वापरली.

**२५ फेब्रुवारी १७६०, सोमवार –** गरनाळीचे ५ मोठे गोळे, ५ लहान गोळे आणि दीड मण ४ पायली दारू वापरली.

**२६ फेब्रुवारी १७६०, मंगळवार –** १ मण दारू आणि गरनाळीचे खापरसुती ५ गोळे वापरले.

**२७ फेब्रुवारी १७६०, बुधवार –** सव्वा मण ७ पायली दारू आणि ३ तोफगोळे.

**२८ फेब्रुवारी १७६०, गुरुवार –** अर्धा मण २ शेर दारू आणि ६ तोफगोळे.

**२९ फेब्रुवारी १७६०, शुक्रवार –** शेख अहमद गोलंदाजास सव्वा दोन मण ५ पायली दारू, ५ तोफगोळे ५ आणि इंग्रज गोलंदाजाला गरनाळीस १ मण दारू व ५ गोळे.

**१ मार्च १७६०, शनिवार –** अहमद गोलंदाज – सव्वा चार मण १ पायली दारू व ९ तोफगोळे.

**३ मार्च १७६०, सोमवार –** शेख अहमद गोलंदाज – सव्वा चार मण २ पायली दारू व ८ तोफगोळे आणि सुभेकरी व आरमारकरी यांना अर्धा खंडी पावणेदोन मण ७ पायली दारू आणि ६४७४ बंदुकीच्या गोळ्या दिल्या.

**५ मार्च १७६०, बुधवार –** शेख अहमद गोलंदाज – सव्वा मण ४ पायली दारू २ तोफगोळे, आणि इंग्रज गोलंदाज – १ मण ८ शेर दारू आणि गरनाळीचे ८ गोळे.

**६ मार्च १७६०, गुरुवार–** शेख अहमद गोलंदाज – दारू पावखंडी अडीच मण आणि १२ तोफगोळे.

**७ मार्च १७६०, शुक्रवार –** इंग्रज गोलंदाज – दीड मण ६ पायली दारू आणि गरनाळीचे १० मोठे आणि १० लहान गोळे, शेख अहमद गोलंदाज – २ मण १ शेर दारू आणि ३ तोफगोळे दिले.

**८ मार्च १७६०, शनिवार –** शेख अहमद गोलंदाज – २ मण १ शेर दारू, ३ तोफगोळे, इंग्रज गोलंदाज – गरनाळीस दारू पाऊण मण व ३ गोळे.

**९ मार्च १७६०, रविवार –** दारू–अडीच मण ४ शेर, ४ तोफगोळे

**१० मार्च १७६०, सोमवार –** खासबारदारास दारू ८ पायली, बंदुकीच्या गोळ्या ६४

**११ मार्च १७६०, मंगळवार –** बालाजी अनंत वेलणकर – दारू पाव मण व बंदुकीच्या गोळ्या ८०, तसेच बरखंदाजांस सव्वा दोन

मण ३ पायली दारू आणि बंदुकीच्या गोळ्या २६४.

**१२ मार्च १७६०, बुधवार –** गरनाळीचे बारास दारू पावणेदोन मण ६ पायली. आणि १४ गोळे.

**१३ मार्च १७६०, गुरुवार –** पाऊण मण ८ पायली दारू, तीन गरनाळ गोळे याशिवाय बरखंदाजास अर्धा मण ६ पायली दारू आणि शिसे गोळ्या ८ व बंदुकीच्या गोळ्या ३२०

**१४ मार्च १७६०, शुक्रवार –** बरखंदाजास दारू ८ पायली बंदुकीच्या गोळ्या ६४

**१५ मार्च १७६०, शनिवार –** फरासीस (फ्रेंच) गोलंदाजास दारू पावणेदोन मण आणि गरनाळ गोळ्या १४, बरखंदाजांस ६ पायली दारू, बंदुकीच्या गोळ्या ४८ आणि अंताजी केशव यांस बरखंदाजीबद्दल ५ पायली दारू ४० गोळ्या.

**१६ मार्च १७६०, रविवार –** इंग्रज गोलंदाज – दारू दीड मण व 10 तोफगोळे

**१८ मार्च १७६०, मंगळवार –** गरनाळीस – दारू अर्धा मण सहा पायली, तोफगोळे ६.

**२० मार्च १७६०, गुरुवार –** ६ खासबारदार आसामीस – दारू ६ पायली बंदुकीच्या गोळ्या ४८

**२३ मार्च १७६०, रविवार –** फ्रेंच गोलंदाज – दीड मण २ पायली दारू आणि ३ तोफगोळे तसेच खासबारदारास जामगीबदल दोर.

**२४ मार्च १७६०, सोमवार –** फ्रेंच गोलंदाज – दारू दीड मण २ पायली आणि १२ गरनाळ गोळे.

**२५ मार्च १७६०, मंगळवार –** रामदेव प्रभू याच्याकडील बरखंदाजास – दारू १ पायली, शिशाच्या गोळ्या ८ तसेच तोफांसाठी दारू अर्धा मण ४ पायली व ५ तोफगोळे

**२६ मार्च १७६०, बुधवार –** गोदजी वाडेकर खासबारदार – १ मण दारू बंदुकीच्या गोळ्या ८ तसेच धनाजी पनेलकर खासबारदार – दारू १ मण बंदुकीच्या ८ गोळ्या.

**२७ मार्च १७६०, गुरुवार –** फ्रेंच गोलंदाज – दारू १ मण २ शेर आणि गरनाळीसाठी ७ खापरसुती गोळे.

**३१ मार्च १७६०, सोमवार –** खासबारदारास दारू ६ पायली, बंदुकीच्या गोळ्या ४८ तसेच बरखंदाजांस दारू ११ पायली.

**४ एप्रिल १७६०, शुक्रवार –** खासबारदारास बरखंदाजीबदल दारू २ पायली बंदुकीच्या १६ गोळ्या.

**६ एप्रिल १७६०, रविवार –** फ्रेंच गोलंदाज – दारू सव्वा मण ४ पायली, गरनाळीचे खापरसुती १४ गोळे आणि २ बिडी गोळे, २

तोफगोळे.

**७ एप्रिल १७६०, सोमवार** – दारू अर्धा मण ४ पायली व गरनाळ गोळे ४.

**८ एप्रिल १७६०, मंगळवार** – दारू १ मण ८ शेर, ८ गरनाळी गोळे. बरखंदाजांस पाव मण दोन पायली व दारू बंदुकीच्या गोळ्या ९६.

**१३ एप्रिल १७६०, रविवार** – शेख अहमद गोलंदाज – दारू अडीच मण, तोफगोळे ४.

**१७ एप्रिल १७६०, गुरुवार** – शेख अहमद गोलंदाज – दारू सव्वा मण, तोफगोळे २. तसेच फरासीस गोलंदाज यास – दारू अडीच मण ४ पायली, १९ तोफगोळे.

याशिवाय हिरकणी गलबत, गलबत अलीमदत, गुराब आनंदीप्रसाद, गुराब शिवप्रसाद, गुराब लक्ष्मी, गुराब साहेबासदर, गुराब सवाई इत्यादी जहाजांनी काशाच्या वेढ्यात भाग घेतला होता. हल्ला करताना जे सामान या जहाजांसाठी वापरले गेले त्याचा तपशील –

गलबत हिरकणी (हुसेन आली कळशीकर) – गोडे तेल आणि हल्ल्याचे दिवशी ३ चंद्रजोती.

गलबत अलीमदत – हल्ल्याचे समयी २० चंद्रजोती लावल्या गेल्या.

गुराब आनंदी – हल्ल्यास जाताना उजेडासाठी ३० चंद्रजोती.

गुराब शिवप्रसाद – गुराब शिवप्रसाद नस्तावर (समुद्रावर) असताना इशारतीसाठी ३० चंद्रजोती.

गुराब लक्ष्मी – काशाला वेढा घातला असता उजेडासाठी २५ चंद्रजोती.

गुराब साहेबासदर – ३० चंद्रजोती.

गुराब सवाई – ३९ चंद्रजोती काशावर मोर्चा लावताना.

वरील स्वारीत लोक जखमी झाले त्यांच्या शुश्रूषेसाठी तबीब (वैद्य) आणून ठेवले त्यासाठी जे सामान लागले ते – तंबाखू, तूप, सुपारी, तेल, तांदूळ, डाळ इत्यादी. तसेच १२ मार्च १७६० रोजी पाद्री वैद्य टोपीकर (इंग्रज) याला आणले त्यासाठी ८ आणे खर्च झाले. हा वैद्य जखमा बांधण्यात कसबी होता. तसेच वैद्य भिवजी खराडा आणि गोदजी मेणे हे दोन वैद्य जखमा बांधण्यासाठी आणले. बुधवार ९ एप्रिल १७६० रोजी त्यांची रवानगी करताना त्यांना तिवट (पागोटे) दिले.

**काशाच्या लढाईत मराठ्यांच्या सैन्यातील जे लोक धारातीर्थी पडले व जखमी झाले त्यांची नावे :** चांग तांडेल, गोदजी कुवेकर,

बावाजी चासणीकर हे तिघे धारातीर्थी पडले. याशिवाय राधा लखमा तांडेल हा जखमी झाला.

**एकूण खर्च झालेला दारुगोळा इत्यादी :**

उंदेरीवर आणि काशावर खुशकीच्या म्हणजेच जमिनीच्या मार्गाने आणि समुद्रीमार्गाने अशा दोन्ही मार्गाने हल्ला केला गेला.

त्यासाठी झालेला खर्च –

| | |
|---|---|
| तोफेची दारू | एकशे सव्वा चोवीस खंडी अडीच मण पाऊण पायली |
| तोफेच्या दारूच्या थैल्या | तेरा हजार सातशे सदोतीस (१३,७३७) |
| तोफेचे गोळे | बावीस हजार दोनशे तेहतीस (२२,२३३) |
| जंबुरी गोळे | एक हजार तीनशे चवऱ्याणव (१,३९४) |
| दांडीचे गोळे | एकशे चार (१०४) |
| गर्मछाटी गोळे | सदतीस (३७) |
| गरनाळी गोळे | दोनशे एक्क्याणव (२९१) |
| कांबा धुकी गोळे ? | तीन हजार आठशे बेचाळीस (३,८४२) |
| दारूचे बाण (अग्निबाण) | वीस (२०) |
| बंदुकीच्या गोळ्या | दोन लाख तीन हजार पाचशे एकोणनव्वद (२,०३५८९) |
| जेंजाली गोळ्या | तेराशे पाच (१,३०५) |
| जामगीसाठी सुत | अर्धा मण ८ पायली |

या लढाई विषयीच्या तपशिलात ज्या सरदारांची आणि इतर लोकांची नावे आली ती – सरदार विसाजीराम परुलेकर सरदार, सरदार बालाजी अनंत वेलणकर, सरदार नार सावंत, सरदार शमन नाईक, मायसारंग, अली सारंग.

## पाल



**उंदेरीवर आणि काशावर हल्ला करण्यासाठी गेलेली जहाजे आणि त्यावरील सामान**

| **गुराब / गलबताचे नाव आणि चालकाचे नाव** | **तोफ आणि बंदुकीची दारू** | **तोफगोळे, जंबुरे गोळे इत्यादी** | **बंदुकीच्या गोळ्या** |
|---|---|---|---|
| गुराब दत्तप्रसाद | २३ खंडी ४ मण सव्वाचार पायली | तोफगोळे १५१९ दांडीचे गोळे २३ गरनाळ गोळे ९ | बंदुकीच्या गोळ्या ४५९२ जेंजाली गोळ्या १५३४ |
| गुराब महालक्ष्मी | १७ खंडी अर्धा मण ३ पायली | तोफगोळे १८६२ दांडीचे गोळे १५ | बंदुकीच्या गोळ्या १५५० जेंजाली गोळ्या २०० |
| गुराब महालक्ष्मी अधिकचे सामान | ११ खंडी ५ मण | तोफगोळे १०७१ दांडीचे गोळे ३४ | बंदुकीच्या गोळ्या १६५० |
| गुराब शिवप्रसाद | साधारण साडेचौदा खंडी | तोफगोळे १८६२ जंबुरी गोळे ९३ दांडीचे गोळे १० गर्भछाटी १० | बंदुकीच्या गोळ्या ३०९० जेंजाली गोळ्या १५० |
| गुराब साहेबासदर | पावणेचवदा खंडी सव्वा मण २ पायली | तोफगोळे ९५० जंबुरी गोळे १३३ गर्भछाटी १० दांडीचे गोळे १४ | बंदुकीच्या गोळ्या २४४५ जेंजाली गोळ्या २०० |
| गुराब सवाई | ९ खंडी अर्धा मण ४ पायली | तोफगोळे ११०२ जंबुरी गोळे ८० दांडीचे गोळे ३ | बंदुकीच्या गोळ्या ११९० |
| गलबत हिरकणी | तोफगोळे | --- | --- |

| | | | |
|---|---|---|---|
| गलत सऊला | ४ खंडी पाऊण<br>मणसाडेतीन पायली | तोफगोळे ११२०<br>जंबुरी गोळे २०० दांडीचे गोळे २ | बंदुकीच्या गोळ्या १००<br>किरकोळ गोळ्या ५०० |
| गलबत सवाई सरदारी – नार सारंग | पाव खंडी सवा दोन मण,साडेतीन पायली. | ७० तोफगोळे | – |
| गलबत सुग्रीव | पाव खंडी, अडीच मण,<br>पावणे पाच पायली. | जंबुरी गोळे १०४, | बंदुकीच्या गोळ्या १४०,<br>किरकोळ १५३ गोळ्या. |
| गलबत चांदणी | पाव खंडी दीड मण, अर्धा पायली. | जंबुरी गोळे १२८, | गोळ्या १५४ |
| गलबत खंडेराव – राम तांडेल | अर्धा खंडी सवाचार मण | तोफगोळे – ६७,<br>जंबुरी गोळे – २४ | बंदुकीच्या गोळ्या १८६ |
| गलबत फतेलष्कर | दीड खंडी, सव्वा मण, ७ पायली | तोफगोळे १९९ | बंदुकीच्या गोळ्या १९९ |
| गलबत समशेर – सुलेमान तांडेल | पावणेतीन खंडी, पावणेर मण | तोफगोळे ४०० जंबुरी गोळे १००<br>दांडीचे गोळे ३ गर्भछाटी गोळे ३ | बंदुकीच्या गोळ्या ८०० |
| गलबत यशवंतराव – राम तांडेल | एक खंडी, पाव मण ३ पायली | तोफगोळे २२४ | बंदुकीच्या गोळ्या ३०० |
| गलबत वारू – अली सतकोजी | दोन खंडी एक मण अर्धा पायली | तोफगोळे २८० जंबुरी गोळे १५ | बंदुकीच्या गोळ्या ५२४ |
| गलबत मार्तंड | दीड खंडी साडेचार मण सहा पायली | तोफगोळे ३०० | बंदुकीच्या गोळ्या १०० |
| गलबत अलीमदत | १ खंडी पाऊण मण | तोफगोळे १२५ | बंदुकीच्या गोळ्या ५०० |
| गलबत नवरतन | अडीच मण १ पायली | जंबुरी गोळे १८ | बंदुकीच्या गोळ्या २१८ |
| गलबत नरनाग | दीड खंडी पाव मण साडेतीन पायली | तोफगोळे १८१ | बंदुकीच्या गोळ्या १८८ |
| गलबत यशवंती | पाऊण खंडी पावणेतीन मण | तोफगोळे १२५ जंबुरी गोळे १० | बंदुकीच्या गोळ्या २५० |
| गलबत सवाई समशेर | सव्वा खंडी साडेतीन मण ९ शेर | तोफगोळे १५१ जंबुरी गोळे २० | बंदुकीच्या गोळ्या २६० |

| | | | |
|---|---|---|---|
| गलबत हणमंत - इसाप तांडेल | २ मण ४ पायली | जंबुरी गोळे ४० | बंदुकीच्या गोळ्या १०० |
| गलबत सवाई बहिरी | पावणे २ खंडी सव्वा ३ मण ९ पायली | तोफगोळे २६२ जंबुरी गोळे २ | बंदुकीच्या गोळ्या २६८ |
| गलबत संभू | एक खंडी सव्वा चार मण ५ पायली | तोफगोळे १७२ | बंदुकीच्या गोळ्या ३७० |
| गलबत मोतीराव | पाऊण मण ७ पायली | जंबुरी गोळे २५ | बंदुकीच्या गोळ्या ९७ |
| गलबत अजबराव | पावणे तीन मण २ पायली | जंबुरी गोळे ६७ | बंदुकीच्या गोळ्या ४०० |
| गलबत सरदारी | पाव खंडी सव्वा तीन मण ९ पायली | जंबुरी गोळे ३६५ | बंदुकीच्या गोळ्या १०७ |
| गलबत मनमुराद - बावाजी तांडेल | २ मण साडेसात शेर | जंबुरी गोळे ३३ | बंदुकीच्या गोळ्या ११६ |
| गलबत शाहतीर | १ खंडी दीड मण अर्धा पायली | जंबुरी गोळे ३ तोफगोळे २४८ | बंदुकीच्या गोळ्या ६२५ |
| गलबत हूरमुजी - पोये तांडेल | पावणेचार मण २ पायली | जंबुरी गोळे ५२ | बंदुकीच्या गोळ्या ३०० |
| गलबत गरूड - अदम तांडेल | पाव खंडी १ मण पावणेपाच शेर | जंबुरी गोळे २१५ | बंदुकीच्या गोळ्या १२५ |

याशिवाय गलबत नागीण आणि गलबत सवाई रघुनाथ ही गलबतेही होती. तसेच मोर्चेबंदीसाठी सैनिक घेऊन जाण्यास समशेर गलबत, फतेलष्कर महागिरी, अवचिती महागिरी ही जहाजे ठेवली होती.

**सैन्याच्या नुकसानीची भरपाई :**

या लढाईत ज्या सरदारांनी आणि त्यांच्या सैनिकांनी भाग घेतला त्यांच्यापैकी काहीजणांच्या वस्तू हरवल्या किंवा त्या वस्तूंचे लढाईत नुकसान झाले. जसे की, रुद्राजीराव धुळप यांची वस्त्रे काशाच्या हल्ल्यात गेली, सरदार राघोजी गोविंद याची ढाल आणि तलवार लढाईत गेली, अब्दुल रहमान गोलंदाज याचा शेला तोफा मारताना जळाला, गोपाळ तांडेल वारू गलबतावरील याच्या अडीशेरीचा खलिता (धान्याची पिशवी) तोफेचा गोळा लागून उडून गेला, नारोजी जाधव याचा तांदुळाचा थैला तोफेचा गोळा लागून उडून गेला, अकल महमद गोलंदाज हा टोणग्यावर असलेल्या गरनाळ तोफेवर होता. मारगिरीमुळे टोणग्याची पाठ भाजू लागली म्हणून अकल महमद याने आपली विजार काढून लावली. ती विजार लढाईच्या धामधुमीत गेली. अशाच प्रकारे लढाई सुरू असताना अनेक सैनिकांच्या वस्तू

जसे की, तलवार, ढाल, कर्णा, वस्त्रे, धान्य इत्यादींचे नुकसान झाले त्याची भरपाई सरकारातून दिली गेली. साधारणपणे दोन हजार सातशे एकोणपन्नास रुपये आणि आठ आणे इतक्या किमतीची वस्त्रे जसे की, धोतरजोड, खाद्या, मशरू, छीटे, तिवट, शेले, सकलाद, जाफरखानी इत्यादी लढाईत गहाळ झाली किंवा त्यांचे नुकसान झाले. तसेच रोख रुपये १८५ रुपये ८ आणे इतके नुकसान झाले. या सर्वांची भरपाई सरकारातून दिली गेली.

**लढाईत भाग घेतलेले सरदार :**

रुद्राजीराव धुळप, भगवंतराव धुळप, कृष्णाजी जैतापुरकर, राघोजी गोविंद, अंताजी गोविंद, विठ्ठल गोविंद वाड, धावजी भाटकर, नारसावंत परुळेकर, सुमेर सावंत, बावाजी चांदवडकर, माधवराव रहाळकर, लखमोजी आबडूसकर, वाटजी नाईक वेंगुर्लेकर, रामजी कदम, हिरसावंत, येस सावंत, केदारजी जाधव, रामजी पाटले, टकोजी नाईक आडवलकर,

**इतर सैनिक :**

रघुजी जावकर (गलबत सवाई), हंसाजी शिंदे (शिवप्रसाद गलबत), राम सावंत, गाव सावंत, गोदजी रुकडे, सिवाजी दामूलजी, बाळाजी अनंत व त्याचा मुलगा धोंडू खिजमतगार, धोंडजी कदम, नारोजी जाधव, सोमाजी चेऊलकर (नरनाग गलबत), बाजी फाटक, बावाजी खांडी, कृष्णाजी भाटकर, दादाजी भाटकर (रघुनाथ गलबत), बाबाजी भाटकर, गोदजी जाधव, येसजी पेडणेकर, धोंडजी सेवणे, दत्ताजी खरांडा, येसजी वरेकर, सेख अहमद पाटणकर, विठ्ठल नारायण, राघोजी कणेकर, गोदजी लाड, येसोजी लाड, येसोजी कदम, इसमाल खान, लक्ष्मणप्रभू, विठोजी पडवळ, सालसकर, पुंजाजी पाटील, आबाजी पाटील, हरबाजी नाईक, समन नाईक, जावजी खडपा, सोईरे परभ, गोद तांडेल मोडकर, राम तांडेल, गोपाळ धान तांडेल, फकीर तांडेल, दाम तांडेल, गणसारंग, गोद सारंग, आबाजी बहिर्जी, त्रिंबक विनायक, सेख अहमद गोदजी मालवणकर, फकरु इब्राम, हुसेन आली केळशीकर, अबदला सारंग, याकूब सारंग, इसमाल याकुब सारंग, इसूबखान गोलंदाज, बाजी कासीम सारंग, आलजी सारंग मुंबईकर, अहमद अली सारंग, सेखजी सारंग, जान सारंग, इसमाल खान कुलाबकर, इब्राम सारंग, हाजत खान, अबदला धर्माजी सारंग, हसन सारंग उंदेरकर, अकल महमद, अब्दुल रहमानकर गोलंदाज, सेख हसन, हमीद कर्णेकरी, इसुफ सारंग (नागीण गलबत), पायाजी नारीगरेकर.

***

प्रकरण १२ :

# जहाजांची दुरुस्ती व देखरेख

आरमाराकडील महत्त्वाच्या कामांपैकी एक काम म्हणजे जहाजांची देखरेख (maintenance) आणि दुरुस्तीचे (repairing) काम होय. याविषयी मोडी कागदपत्रांमधून जी माहिती मिळते ती अत्यंत महत्त्वाची आहे. जहाजांची देखरेख आणि दुरुस्ती करण्यासाठी कोणकोणत्या वस्तू कशाकशासाठी वापरत असत त्या खालीलप्रमाणे:

**जहाज बनविताना सोन्याचा वापर (इसवी सन १७७६–७७) :**

विजयदुर्ग बंदरात असलेल्या गलबतांपैकी काही गलबते वेगवेगळ्या कारणांनी फुटली आणि निकामी झाली. सबब, त्यांची दुरुस्ती केली गेली. या गलबतांना नवीन पठाणे घातली गेली. पठाण म्हणजे मांडीच्या मागचे व गलबताच्या पुढच्या बाजूचा कणा म्हणून वापरले जाणारे लाकूड. त्यावेळेस सुमुहूर्त बघून गलबत नरनाग व गलबत सवाई समशेर यांचे नवीन पठाण घालताना त्यात सोन्याच्या मेखा मारल्या गेल्या. या मेखा प्रत्येकी एक मासा इतक्या वजनाच्या होत्या. दोन्ही गलबतांच्या मेखा मिळून अडीच रुपये किंमतीच्या सोन्याच्या मेखा वापरल्या गेल्या. यावेळेस सोन्याचा दर १५ रुपये तोळा इतका होता.

**इसवी सन १७६२–६३ :**

या साली काही गलबते जी नादुरुस्त होती ती दुरुस्त करून चालती केली. त्याची ताबरात (गंज काढणे) करून चालती केली. त्यात गलबत हनुमंत, यशवंती, बिरबा प्रसाद, वाघी, गरूड, समसेरजंग, गंगाप्रसाद, दुर्गाप्रसाद, यशवंती, अलीमदत, मनपवन, फतेसमर या गलबतांचा समावेश होता.

**दत्तप्रसाद पालाची दुरुस्ती :**

पाल दत्तप्रसाद जुने झालेले असल्याने स्वारीच्या उपयोगी राहिले नाही, सबब इसवी सन १७७० साली पाल धड्यावर घेऊन त्याची दुरुस्ती केली गेली. पालाचे पठाण (गलबताच्या पुढच्या बाजूचा कणा म्हणून वापरले जाणारे लाकूड) नवीन केले. तसेच नाळीच्या (गलबताचा पुढील बाजूचा टोकदार भाग) मांडीपर्यंत चार रांगांचे काम यापूर्वीच केलेले होते. त्यावर नाळीची मांडी घालून दोन्ही बोडदांचे नवे काम केले. याशिवाय एक वर्ष आधी म्हणजेच सन १७६९ मध्ये

उजव्या बोडदास बत्तीस रांगा व डाव्या बोडदास ३१ नव्या रांगा घातल्या. तसेच चालू वर्षात उजव्या बोडदास चार रांगा व डाव्या बोडदास पाच रांगा नव्या घातल्या.

**दत्तपाल तीरकती (इसवी सन १७९५-९६) :**

दत्तपाल तीरकती (तीन शिडाचे जहाज) थोर खटारा (जहाज) जुने होऊन काम जाया जाले व स्वारीच्याही उपयोगी राहिले नाही म्हणून धव्यावर घेतले. स्वारीसाठी एक थोर खटारा (मोठे जहाज) असावे म्हणून सुभ्याहून पेशव्यांना विनंती करण्यात आली. सरकारातून १५ हजार रुपयांची तरतूदही करण्यात आली. नवीन डाव (जहाज) खरेदी करण्यासाठी दर्यावर्दी सारंग, सुतार इत्यादी कारागीर पाठविले. परंतु जो डाव पाहिला तो स्वारीच्या उपयोगी नाही असेच सर्वांनी सांगितले. सबब दत्तपाल तीरकती जहाजाची दुरुस्ती करून तेच वापरण्याचे ठरविले. यामध्ये नाळीची मांडी नवीन बसविली गेली आणि उजव्या व डाव्या बोडदास लाकडी फळ्यांच्या नवीन रांगा घातल्या. त्यासाठी फणस, आंबे व उडणीची लाकडे वापरली.

**नारायण पालाला रफू केले (इसवी सन १७९५-९६) :**

सुतार, बेलदार यांनी नादुरुस्त गलबते दुरुस्त केली. त्यात नारायण पाल जुने झाल्यामुळे समुद्राचे पाणी आत येऊ लागले होते. सबब त्याला काही रांगा नवीन घातल्या आणि बाहेरील अंगाने रफू केले म्हणजेच गाबडे बसविले. गाबडे म्हणजे चीर किंवा भोक बुजविण्यासाठी लावलेला तुकडा. तसेच इतर गलबते जाया झाली होती त्याची दले (गाभा) भरून तयार केली.

**दत्तप्रसाद गुराबाची दुरुस्ती व देखरेख (इसवी सन १७६२-६३) :**

या वर्षी गुराब दत्तप्रसाद याच्या दुरुस्तीसाठी आणि देखरेखीसाठी कोणकोणत्या वस्तू वापरल्या त्याचा तपशील पुढीलप्रमाणे -

**गोडेतेल** - डांबर कढवून गलबताला लावण्यास, कारी (राळ) कढवण्यास, गलबताच्या पोटात घालावयास (गलबताला आतल्या बाजूने तेल लावण्यात येई), बोंबास लावण्यासाठी (बोंब म्हणजे नाळीच्या टोकावरील लहान शिडाची काठी),चुन्यात घालून ल्हांजास लावले (ल्हांजा म्हणजे बोंबेच्या वरचे टोक), कुमकळसास (बहुदा जहाजाचा कळसाकडील भाग), कविल्यास (कविले म्हणजे मोठे खिळे), चांभार कामाकडे जुना कील मढविण्यास (कील म्हणजे पाचर किंवा खुंटी), कलफताच्या कामास (जहाजावरील लोहार सुतार इत्यादी कारागिरांचे काम म्हणजे कलफत), लांबी कालविताना त्यात घालण्यास, कवीले जंजिरास (साखळ्यांस) मारण्यास, मालके रांगेस रंग करून लाविला त्यास (मालके रांगा म्हणजे पठाणावरच्या

दोन्ही बाजूंच्या लाकडी फळ्या), फाणस कंद्यात घालण्यास (फाणस कंदे म्हणजे कंदिल), सुकाणाला चुन्यात घालून लावण्यासाठी, तोफेच्या लाकडी गाड्यास, तारेत तार गुंफताना तारेला लावण्यास, अलाथीचे रिंगण करावयास (अलाथ म्हणजे वल्ह्याच्या काठीला लावण्यात येणारा रुंद पंखा), फुरारास (मूळ शब्द फरारा दोरखंडाला गुंडाळण्याचे कापड), लंबराण तासण्यास (लंबराण म्हणजे जड पदार्थ उचलून वर ठेवण्यासाठी जहाजावर वापरतात तो दोरखंड), डांबरात घालण्यास, किरकोळ डागडुजीच्या कामास.

**सुत :** गुराबास नवी शिडे केली ती शिवण्यास – पैकी १ मोठ्या गावीस (शिडास), १ कळंबी काठीच्या शिडास, ३ फोकीस (फोकी म्हणजे जहाजाच्या नाळीवर असलेले त्रिकोणाकृती शीड), याशिवाय जुन्या शिडाच्या डागडुजीस वगैरे, निशाणे मारवाले शिवण्यास (मारवाले म्हणजे बहुदा निशाणा तपासून बघण्यासाठी बनविलेले कापडी निशाण).

**लोखंड :** मालके रांगा केल्या त्यास, पिंजरीस (बावटा किंवा निशाण उभे करण्यास केलेली चौकट), शिंगड्यास ? लागवड, मांदी नवी घातली त्यास (मांडी किंवा मांदी म्हणजे बुंध्याचे आडवे लाकूड), बोडदास (जहाजाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूच्या भागास बोडद म्हणतात), पावड्यास लागवड (पावडा म्हणजे जहाजाच्या नांगराचा फाळ किंवा आकडा), नाळीच्या (गलबताचा पुढील बाजूचा टोकदार भाग) कामास, भिंड्यास लागवड (भिंडी म्हणजे गोफण), भांड्याच्या (तोफांच्या) लाकडी गाड्यांस लागवड, गावीस (शिडास) पटे व खिळे, दादरीच्या कामास (दादरी म्हणजे लहान जिना), पठाणाचे कामास, तूतकास ?, तोल्यास (तोला किंवा तुला म्हणजे वजन करण्याचा काटा), दलास (जहाजाचा गाभा म्हणजेच आतील पोटाचा भाग), पाण्याच्या टाक्यांसाठी, भांड्यास (तोफांसाठी), वरांच्या छत्रीस (वरा म्हणजे जहाजाच्या मागच्या बाजूच्या छत्रीस ?), कात्र्या चाकू यास, तोगास (तोग म्हणजे तोफेचा साखळदंड), सुबास (तोफ ठासण्याची ठासणी), कुंप्यास (खुंटीस), बोंबास, नर–माद्या सुकाणास – २ माद्या, नर १ (एकमेकांत अडकविता येतील अशा वस्तू), सोबीस (सोबी किंवा सोबणी म्हणजे पाण्याच्या टाकीखाली ठेवण्याचे टेकण).

**चिथडे :** आलाथीच्या रिंगणास (आलाथ म्हणजे वल्ह्याच्या काठीला लावण्यात येणारा रुंद पंखा), पैकी कलफताच्या कामास (जहाजावरील लोहार सुतार इत्यादी कारागिरांच्या कामास),

फुरासास, नाळीच्या सोबीस (नाळीच्या टेकणास).

**मालदिवी दोरखंड :**

परभान हांजा १ (मोठ्या शिडाच्या लाकडाचा दोरखंड), १ गावीची यारी (शिडाची दोरी) , इद्रीस १ (मूळ शब्द अदरस म्हणजे ज्या दोरीने बोंबाचे शीड मोठ्या काठीस बांधतात ती दोरी), विरी दोर १?, गावीची इस्तगी १ (गावी म्हणजे परभानाच्या वर डोलकाठीच्या कळसाजवळची शिडाची दोरी), मोठ्या अवजाराच्या (शिडाच्या) हांजास?, थोरले गावीची मतेली (मतेली म्हणजे शेंड्याची दोरी), थोरले गावीच्या इस्तंग्या (दोऱ्या), कलंबीच्या सुंबारास (सुबार मूळ शब्द सबाय म्हणजे शिडाच्या काठीची दोरी), १ नांगराची यारी (दोरखंड), थोरल्या अवजाराचे दमान (दमान म्हणजे गलबताच्या मागील बाजूस सुकाणाकडे बांधलेली दोरी), अवजारांच्या शिंक्यास (शिंके म्हणजे शिडाची घडी ज्या दोरीने बांधतात ती दोरी ), गावी अवजार (डोलकाठीच्या कळशीजवळचे शीड), मोठे अवजार (मोठे शीड), तलीकत अवजारे ?, तिरकत सुबरा (तीरकत काठीचे दोरखंड), कळंबी गावीस (कळंबी शिडास), मिजाम अवजारास (मिजाम अवजार म्हणजे गलबताच्या मुख्य शीडापुढील शीड), तोफांसाठी व मोठ्या पावड्याचे (नांगराचे) खुरूस ? बांधावयास, गावी शीडाच्या डागडुजीस, फोक्यास (नाळीवरच्या शिडास), कप्प्याचे बांधाबांधीस (कप्पी म्हणजेच इंग्रजी भाषेत पुली).

**इतर वस्तू – गेरू (काव) :**

तामरातिच्या कामास (डागडुजी व गंज काढण्याच्या कामास) **ताग :** मस्तूरास (मस्तूर म्हणजे बारीक पण जाड दोरी), तोफेच्या ठासणीचे कुंचे बांधण्यास, सुकाणास, फुरासास (बहुदा वस्त्रांस किंवा निशाणास). **चंद्रस (राळ)** – कारीच्या (राळ) रांध्यास, डांबराच्या रांध्यास (डांबर गरम करताना), रंगात घालण्यासाठी. **कापूस –** तामरातीच्या (डागडुजी, गंज काढून टाकणे) कामास, जहाजांना चुना लावताना, तख्ते व गाबड्याचे कलासिस ? लागवड पैकी मालके रांगेस, मांदीस, बोडदास, नाळीच्या खांद्यास, बोंबास, जुगास, गाबड्यास, रांगांच्या तख्तास, टाक्याच्या तख्ताच्या किरकोळ डागडुजी इत्यादीसाठी. **मेण –** नवी अवजारे शिवली त्यास पोत्यासाठी **गंधक** – तोफांची तोंडे रंगवण्यास. **कच्चे तेल / सिफा तेल –** संपूर्ण जहाज किंवा त्यावरील लाकडी सामानाला तेल लावत असत. **पतंग** : निशाणे रंगवण्यासाठी पतंग नावाच्या झाडाचा रंग वापरत असत. या झाडाच्या लाकडाचा रंग जो तांबडा असतो आणि त्यापासून गुलाल तयार करतात. **सुतळी** – शिडांच्या डागडुजीस, तोफांचे गज

बांधण्यास, तोफेच्या दारूच्या थैल्यांची तोंडे बांधण्यास, सुकाणास, बोंबास. **साबण** – कंदील स्वच्छ करण्यास, वस्त्रे आणि कापड स्वच्छ करण्यास, लंबराणास तेलात घालून लावण्यास. तार – अलाथीस रिंगण करण्यास, शिडाच्या काठ्यांसाठी, दोन्ही बोडदास लावण्यास, तोफांना लावण्यास, अलाथास लावण्यास, शिडांना लावण्यास, अवदानास (शिडास) लावण्यास, सुकाणास लावण्यास. **उद आणि कापूर** – पाण्याच्या टाकीस लावण्यासाठी. आरमार स्वारीवर असताना बरेच दिवस समुद्रावर राहावे लागत असल्याने पाणी नासू नये म्हणून पाण्याच्या टाकीला आतल्या बाजूने उदाचा धूर देऊन कापूर चोळला जात असे. **शेंदूर व डिंक** – गलबते, ढबूसा इत्यादी रंगवण्यास शेंदूर, नील, हरताळ, हरडा वापरत असत. ढबूसा म्हणजे जहाजाच्या मागच्या भागात असलेली खोली. डिंक रंगात घालण्यासाठी वापरत असत. **डांबर** – जहाजास व मचव्यास चोपडण्यास, तूतकाचे ? जमिनीस व पाण्याच्या टाकीस बाहेरून चोपडण्यास. **तूप** – परभानी काठीस, मोठ्या काठीस, मोठ्या परभानास, मोठ्या गावीस, मोठ्या सुबारास, तीरकत गावीस, तिरकत परभानास, तीरकत सुबारास, कळंबी काठीस, कळंबी परभानास, कळंबी सुबारास, नुतकाचे ? जमिनीस डागडुजीस, बोंबाचे लागवडीस, टाक्या चोपडताना, फुरासास, नव्या फोक्याच्या लिंगरणीस ?. **बालद्या (बादल्या)** – घामत टाकण्याबदल, अधोड्या (चामडे) सोगमे ? मढावया आणि किरकोळ लागवड, कातडे बोंबाचे लागवडीस. **शिंगे ढोरी** – भांड्याच्या (तोफेच्या) रजकेची दारू घालावयासी.(शिंगे म्हणजे दारू ठेवण्यासाठीचे शिंग). **लाकडे** – सागवानी, आंब्याची, उडणीची आणि पुनईची लाकडे दुरुस्तीसाठी वापरली गेली. **चुना** – गलबतांना लांबीच्या चुन्याने लेप लावला जात असे. **सोमल** – गुराबांवर आणि गोदीत व कोठीकडे उंदरांचा त्रास नित्य होत असे; त्यासाठी सोमल वापरत असत. सोमल म्हणजे एक विषारी पदार्थ. **दिवाबत्तीस तेल** – गुराबे पर्जन्यकाळी गोदीत व धड्यावर छावणीस असता दिवाबतीस तेल याशिवाय चुका बोंबास मारण्यास. जामग्यास दोर, बोंबासाठी तांबे, बोंबाच्या तळात घालण्यास शिसे, निशाणे (झेंडे) रंगवण्यास काव, कडू तेल पुढील गोष्टींसाठी वापरले जात असे – विरी दोरास ?, मचव्याच्या बोडदास, दादरीला चोपडण्यास (लहान जिना), वरांच्या छत्रीच्या चोपडण्यास (वरा म्हणजे जहाजाची मागची सुकाणाकडील बाजू). नवार (सुती पण जाड पट्टी) हात कापड पडद्याच्या लागवडीबदल, कपाटे खजुरी (नक्षीदार), वेळूच्या पाट्या.

**कापड (सनगे)** – १) किता सनगे पावड्याच्या (नांगराच्या)

काडाच्या (दांड्याच्या) फुरासास हात १७ बत्तीस हाती २) गोणपाट सनगे अठावीस हाती फुरासास (फुरास किंवा फरास याचा मूळ शब्द फरारा असून त्याचा अर्थ निशाण, पताका किंवा वस्त्र असा होतो. हे कापड दोरखंडास गुंडाळण्यासाठी वापरण्यात येत असे) ३) तीरकत काठीच्या खालच्या बाजूस ३० हात, तीरकत गावीच्या फरोदयास ? २१ हात, थोरले गावीच्या खालच्या बाजूस २८ हात, परभानाच्या काडास हात साडेदहा, परभानाच्या इद्रीसास हात साडेदहा, मचव्याच्या पागेस साडेतीन एकूण, तीरकत गावीस, कळंबी गावीच्या काडास हात साडेदहा, कळंबी गावीचे फरोद्यास हात साडेदहा, कळंबी गावीस फुरासास साडेतीन एकूण, तीरकत गावीच्या साबईस (सबायास) ८ हात.

**छोटी-मोठी दुरुस्ती :**

गोदीमध्ये गलबतांच्या किंवा गुराबांच्या छोट्या-मोठ्या दुरुस्तींची कामे चालत असत. उदाहरणार्थ : १) फिरंगी याचे लढाईत गुराबास व गलबतास गोळे लागोन जाया जाहली ते निकडीने सुतार वगैरे याणी मेहनत करून नीट केली सबब बक्षीस दिले (इ.स.१७६२) २) गुराब गणेश प्रसादच्या कामासाठी मुंबईहून ४६२ रुपये ८ आणे इंग्रजी रुपयाचे सामान घेतले (इ.स.१७६१) ३) आरमाराची निशाणे व लागबोटीची अवजारे रंगवण्यासाठी डिंक, लोध्र, चिंच, काव, फटकि, तसेच लांगबोटीची शिडे रंगवण्यासाठी पतंगी रंगात घातला जाई. (इ.स.१७६१) ४) दर्यावर्दी गलबताच्या पाण्याच्या टाक्यांचे काम करीत असताना व डांबर लावताना धूर तोंडात जात असे सबब तोंडात खोबरे धरण्यास देत असत. तसेच गलबतांना चुना इत्यादी लावत असताना दर्यावर्दींच्या अंगास तेल लावण्यात येई. (इसवी सन १७७०)

***

प्रकरण १३ :

# जहाज बांधणी व नौबंदिस्त महादेव पाल

आरमाराकडे नवीन जहाजे कशा पद्धतीने बनत असत; त्यासाठी कोणकोणत्या वस्तू वापरत असत, यांविषयीची काही मोडी कागदपत्रे विजयदुर्गच्या कागदांत बघायला मिळाली. त्याविषयीच्याच महत्त्वाच्या नोंदी पुढीलप्रमाणे **(टीप – या प्रकरणातील शब्दांचे अर्थ आरमार शब्दकोश या प्रकरणात बघावेत) –**

**जहाजांसाठी लाकडाचे कारखाने (इसवी सन १७६३) :**

मौजे हातदे या गावी सागवानी रान होते ते आरमाराकडे लागणाऱ्या लाकडांसाठी राखीव होते. यामुळे इसवी सन १७६३ साली गावाची वस्ती कमी झाली असा उल्लेख सापडतो. पर्जन्यकाळी मौजे हातदे आणि रामगड येथील जंगलामधून सोटे, वासे तोडण्यास आणि सौंदल माहाली पतींगे (वल्ह्याचा दांडा) तोडण्यास लोक ठेवले जात असत.

**हुन्नावर येथून आयात :**

जहाजांसाठी लागणारे काठ्या व सोटे हुन्नावर येथूनही मागविले जात असत. इसवी सन १७७० सालातील एका नोंदीत गलबत धक्यावर घेताना हुनावरी काठी वापरल्याचा उल्लेख येतो.

**अलीराजाच्या संस्थानातून केलेली आयात (इसवी सन १७७४–७५) :**

कन्नूर येथील सुलतान अली राजा याच्या संस्थानातून जहाजांसाठी लागणाऱ्या काठ्या, काथ्या वगैरे मागविल्या जात असत. अली राजा हा मराठ्यांचा चांगला मित्र असून नेहमीच मराठ्यांच्या उपयोगी पडतो असा उल्लेख विजयदुर्गच्या कागदपत्रांतून सापडतो. याशिवाय आरमारच्या बेगमीस वसईहून चारशे सोटे आणले (इसवी सन १७७०).

**जहाज बांधणीसाठी किंवा दुरुस्तीसाठी वापरण्यात येणारी लाकडे (इसवी सन १७६२–६३) :** सागवान, फणस, आंबा आणि उडणीची लाकडे प्रामुख्याने वापरली जात असत. याशिवाय सागवानी सोटे सोळा हाती, कुरव्यासाठी उडणीची व रायवळ, तुळईसाठी रायवळ, दांडे गेलीचे? लटिंग खैराच्या लाकडाचे, तर्फा, खांदे उडणीचे, चिलपे रायवळ व उडणीची, वासे माडाच्या लाकडाचे व वेळूचे, काठ्या चिवल्याच्या, चुलेत्या, डेरे उडणीचे, डेरे रायवळ, झाऱ्या रायवळ, झाऱ्या उडणीच्या, वाक रायवळ व उडणीचे,

तख्ते रायवळ सोळा हाती, बरगे सागवानी, पतींगे सायली, कणे तोफगाड्याचे, चाके तोफगाड्याची, पेलणे. याशिवाय नक्षीदार कपाटे, लाकडी कमाना, रुब ? लाकडी, लाकडी पेट्या, सागवानी सोटे, सागवानी तुकडे, इत्यादी वापरण्यात आले.

**शनिवार वाड्यातील जहाज :**

इसवी सन १७८३ साली सवाई माधवराव पेशवे यांनी विजयदुर्ग सुभ्याकडे पत्र पाठवून तीरकती पालांच्या दोन प्रतिकृती बनवून पाठविण्याची आज्ञा केली. त्यानुसार दोन प्रतिकृती बनवून पाठविण्यात आल्या. यापैकी एका जहाजाचे नाव 'सवाई पाल' ठेवले होते. ही जहाजे बनविण्यासाठी हस्तीदंत वापरले गेले. हस्तीदंतापासून जहाजांची पिंजरी (निशाण लावण्यासाठीची चौकट) आणि ढबूशा (जहाजाच्या मागच्या बाजूची खोली) बनविला गेला. याशिवाय जहाजाची लंबराणे (दोरखंड) आणि त्याच्या कड्या बनविण्यासाठी तांबे वापरले गेले. तसेच हे तांबे जोडण्यासाठी चांदी वापरली गेली. लोयली (नांगर) आणि पावडा (लहान नांगर) बनविण्यासाठी लोखंड वापरले गेले. याशिवाय जहाजावर चंद्रजोतीही दाखविली गेली. याविषयीचा मूळ मोडी कागद परिशिष्टमध्ये पहावा.

**नौबंदिस्त महादेव पाल (इसवी सन १७६८-६९) :**

या वर्षी वसईच्या बंदरात महादेव या नावाचे नवीन तीरकती पाल म्हणजेच तीन काठ्यांचे लढाऊ जहाज बनविण्याचा कारखाना लावला होता. महादेव पाल तयार होऊन विजयदुर्ग येथे आरमारात कसे रुजू झाले याची माहिती पुढीलप्रमाणे – महादेव पाल नवीन वसई येथे तयार होऊन विजयदुर्ग येथे आणले गेले. वसई ते विजयदुर्ग या प्रवासात कोणकोणत्या वेळेस तोफांचे बार उडविले गेले त्याच्या नोंदी पुढीलप्रमाणे – मुहूर्त पाहून नांगर उचलला त्यावेळेस ५ बार, विसाजीपंत सरसुभेदार महादेव पाल पहावयास आले त्यावेळेस १२ बार, रामाजी महादेव यांचे चिरंजीव वसईहून आले त्यावेळेस ५ बार, रामाजी महादेव सुभेदार साष्टीहून वसईस आले ते समयी १२ आणि पाल पाहण्यास गेले ते समयी १२ बार, तसेच पाल पाहून खाली उतरले ते समयी १२ आणि साष्टीस परत जाते समयी १२ बार, वसई बंदरातून पाल विजयदुर्गकडे निघाले त्यावेळेस ३ बार, वसईच्या समुद्रावर २ बार, केळशीच्या समुद्रावर २ बार, विजयदुर्गच्या समुद्रावर श्रीरामेश्वराच्या नावे २ बार, विजयदुर्गच्या बंदरात आल्यावर सुभेदार आनंदराव धुळप पाल पाहण्यासाठी चढले त्यावेळेस २ बार उडविले. अशाप्रकारे वसई येथे तयार झालेले महादेव पाल विजयदुर्गच्या

बंदरात आरमाराकडे दाखल झाले. हे महादेव पाल जवळपास २६ वर्षे आरमाराच्या सेवेत होते.

**महादेव पालाचा अंत :**

सोमवार, ३० डिसेंबर १७९३ रोजी प्रातःकाळी महादेव पाल विजयदुर्ग बंदरातून कुलाब्याच्या मसलतीस स्वारीसाठी बाहेर निघत असताना अचानक समुद्रावर वादळ झाले. तोंडचा वारा तुफान सुटला आणि पाल समुद्रात जाण्याऐवजी उलट दिशेला म्हणजे बंदराच्या दिशेने येऊन विजयदुर्ग जंजिऱ्याच्या जवळ हेसरले आणि खडकावर लागून फुटले. अशा तऱ्हेने मराठा आरमारात जवळपास २६ वर्षे तैनात असलेल्या महादेव या लढाऊ जहाजाचा अंत झाला. या जहाजात असलेले सर्व सामान समुद्रात बुडाले. त्यातील काही सामान नंतर पाणबुडे लावून बाहेर काढले, मात्र जहाज पूर्णपणे दर्यागर्क झाले.

विजयदुर्गच्या मोडी कागदपत्रांतून महादेव पालाच्या (जहाजाच्या) बांधणीविषयीची महत्त्वाची माहिती मिळते. यामध्ये जहाज बांधणी करत असताना कोणत्या प्रकारच्या वस्तूंचा वापर किती प्रमाणात केला, याच्याही विस्तृत प्रकारच्या नोंदी मोडी कागदपत्रांतून पाहायला मिळतात. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे – **(याविषयीचे मूळ मोडी कागद परिशिष्टमध्ये पहावेत)**

**लोखंडी वस्तू :**

२ तरण सिलाचे पाटे, २ चाव्या तिरकत काठी व मोठ्या काठीच्या, २ मारपेच?, १०० गोळे तोफी बिडी, १२ बिडी तोफा पैकी १ तोफ – (२३66६) तेवीस हंदरवट सहा रात, दारू 66१० रात. हंदरवट म्हणजे बहुदा खंडी आणि रात म्हणजे शेर असा अर्थ असावा. कारण ही मांडणी खंडी, मण, पायली आणि शेर या परिमाणांसारखी लिहिलेली आहे. याचा अर्थ या १२ तोफांपैकी एक तोफ २३ खंडी ६ पायली इतकी वजनाची असावी आणि या तोफेचा एक बार उडविण्यासाठी १० शेर दारू लागत असे.

**कापडी वस्तू :**

१२० थैल्या तोफेच्या दारूसाठी, १७ दुहेरी कापड दारूचे पोते बनविण्यासाठी, २ चवाटे सनगे. **लाकडी दागिने** – २ सोटे सागवानी, २० कपे पैकी ११ एक जंगी, ९ दुजंगी, १२ गाडे तोफांचे, ४ टाक्या झाकणा समवेत, १ मालमी पेटी. **चामड्याच्या वस्तू** – चरशे एकूण ५, पैकी ३ खुर्शा गलबताच्या तिन्ही काठ्यांचे खाली तळास घातल्या होत्या, १ बोंबास, १ तोफांचे झाकणास, १ कातडे बोंबाचे विलायती, १ बुधला तेलाचे बारदानास, बालद्या (बादल्या). **तांब्याच्या वस्तू** – ४ नौबती, २ चमचे. **शिशाचे दागिने** – तोफांच्या झाकण्या ७, १

मुरुद ? पाणी तोलावयाचा, २ गोळे गर्भछाटी. **इतर किरकोळ वस्तू** : पोलादी दाभणे १०, पंचरसी घाट १, चंद्रजोती २५, २ काथेरी दोरडी.

**थोरल्या काठीसाठी एकूण लागलेल्या वस्तू ३७८ :**

त्यापैकी ११२ वस्तू डोलकाठीसाठी वापरल्या त्याचा तपशील – ७ मालदीवी लंबराणे जोड्या समेत फुरारी, २८ मुतामे ? – १४ लोखंडी, १४ लाकडी साधी, १४ घोडले ? लंबराणास, १४ मात – २ मात जोड्या काथेरी समेत फुरारी, २ याऱ्या मालदीवी, २ तुला लोखंडी, ८ कपे – पैकी ४ एकजंगी, ४ दुजंगी. ४० रिकेते ? सिक्यांस पैकी २० उजवे बाजूस २० डावे बाजूस, १ दोरडे लंबराणास, ४ साबाईस सामान – १ मालदीवी दोरडे, १ कपा दुजंगी, २ किरकोळ घोडले ? एकूण ४. ४ फोगी, हांज्यास – २ काथेरी सेडे, २ येकजंगी. १४ दोरडी, काथेरी दोरडी ५७, लाकडी कपे – ५ दुजंगी, ६ एक जंगी एकूण ११, २ तुला लोखंडी, याऱ्यांसाठी, २८ मुतामे ? – १४ लोखंडी पट्यांची, १४ साधी एकूण २८

**परभान काठीचे सामान (परभान काठी म्हणजे मोठ्या शिडाला जोडलेली काठी) :**

**हांज्यास सामान** – १ मालदीवी दोरडे, ४ कपे – २ दुजंगी २ एकजंगी एकूण ६, **मतेल्यास** – २ किरकोळ सेडे, ४ कपे पैकी २ दुजंगी २ एकजंगी एकूण ६, २ लास ? कपे येकजंगी, **सीजी ? दोरास** – ४ मालदीवी सेडे, १० कपे पैकी ४ एकजंगी ६ दुजंगी, **बटल्यास ? सामान** – ४ सेडे, काप घाटी काथरी, कपे १० पैकी ६ दुजंगी, ४ एकजंगी एकूण १४, ४ गावी दमान – २ सेडे मालदीवी, २ कपे येकजंगी एकूण ४, २ मालदीवी दोरडी, २ मुतामे लाकडी ?, १ दमानी घोडला ?, इस्तंग्यास सामान ? – २ दोरखंड कापघाटी ?, ४ कपे येकजंगी एकूण ६, बरासास सामान – २ दोरडी कितानी, ४ येकजंगी कपे एकूण ६, फोगी व हांज्यास सामान – २ सेडे कापघाटी, २ कपे एकजंगी एकूण ४, इसकाते ? – ८ कितानी सेडे, ८ तुला लोखंडी एकूण १६, दोरडी १७ (दोरखंड) समेत फुरारी, किरकोळ सामान– १२ सेडे १ घोड्ला ? – १३, तुला लोखंडी ८, लाकडी वस्तू – ४२ कपे – १५ दुजंगी, २ एक जंगी , २ मुतामे ?

**गावी दमानसाठी वापरलेल्या वस्तू (गलबताच्या मागच्या बाजूस सुकाणकडे बांधलेली शिडाची दोरी)** – ४ लंबराणे जोड्या, १६ मुतामे ? पैकी ८ लोखंडी पट्ट्याची, ८ लाकडी पट्ट्याची एकूण १६. किरकोळ वस्तू – घोडले ? फरोंद्या जोड्या ? – २ किरकोळ, २ काथेरी, १६ कपे येकजंगी, ८ कितानी घोडले एकूण

२८, फरोद्याच्या? जोड्यास तुला लोखंडी

**हांज्यास (दोरखंडास) सामान** – २ मालदीवी दोरडी, २ यान्या हांजे कापघाटी ? , ४ कपे, २ दुजंगी, २ एकजंगी, २ तुला भोवर कड्यांच्या एकूण १०, ३ गावी इरेदोर ? – १ मालदीवी दोरडे, २ कपे दुजंगी एकूण ३, ८ लंबराणास हुकपेची दोर (आकडा असलेला दोर)

**गावी परभानास वापरलेल्या वस्तू** – मतेले – २ कितानी दोरडी, ४ कपे एक जंगी, २ लास ? कपे एकजंगी, परभानाच्या तऱ्या ? – २ कितानी सेडे, १ घोडला कितानी, २ मुतामे लाकडी एकूण ५, बरासास (दोरखंडास) – २ कितनी दोरडी, ६ कपे एकजंगी एकूण ८, सुरज्या – २ कापघाटी सेडे, २ कपे एकजंगी, इस्तंग्यास सामान – २ सेडे काथेरी, ४ कपे एकजंगी, फोगी वाहने – २ सेडी काथेरी, ४ कपे एकजंगी, साबाईस सामान – १ दोरडे मालदीवी समेत फुरारी, १ कितानी घोड्ला, ८ कपे पैकी २ दुजंगी, १ एकजंगी, बुलीणे ? – २ काथेरी सेडे, ४ कपे एकजंगी, सबार गावीचे – १४ किरकोळ लंबराणे जोड्या पैकी २ कितानी दोरडी, ८ कपे एक जंगी, ४ कितानी घोडले ? एकूण १४, मतेल्या – २ कितनी दोरडी, ४ कपे एकजंगी एकूण ६ साबाई – कितानी दोरडे, १ कपा येकजंगी, फरोद्यांस ? – २ कितानी जोड्या ८ कपे एकजंगी, इस्तंग्यास – सोटे मालदीवी

**परभान सबाराचे (शिडाच्या काठीची दोरी)** – २ लास ? कपे एक जंगी, बरास – २ सेडे काथेरी, ६ कपे एकजंगी एकूण ८, इस्तंग्यास सामान – २ काथेरी सेडे, २ कपे एकजंगी एकूण ४, हांज्यास (दोरखंडास) – १ सेडा काथेरी, २ कपे एकजंगी एकूण ३, तण्यास ? – १ सेडा काथेरी, १ कपा एक जंगी एकूण २, १३ कपे एक जंगी ६ दोरडी काथेरी एकूण १९

**तीरकत काठीचे सामान** : १११ वस्तू काठीस – काथेरीस जोड्या लंबराणासमेत फुरारी – मुतामे – लोखंडी, १४ लाकडी साधी एकूण २८, मात (मातण) – २ काथेरी सेडे (बहुदा दोरखंड) समेत फुरारी, ८ कपे पैकी ४ दुजंगी ४ एकजंगी एकूण ८, ४ तुला लोखंडी एकूण १४, १ आरवी ? कितानी दोरडे, साबाईस सामान – पैकी १ मालदीवी समेत फुरारी , २ कपे दुजंगी, २ कितानी घोडले एकूण ५, इसफाते ? किरकोळ समेत फुरारी – ८ इसकाते, ८ तुला लोखंडी एकूण १६, ४० रीकीते ?.

**परभानास सामान** – हांजा – १ काथेरी सेडा, ४ कपे पैकी ३ एकजंगी, १ दुजंगी, मतेले (वरची शेंड्याची जोडी) – कितानी सेडे, ६ कपे पैकी २ एकजंगी, ४ दुजंगी, २ लास ? कपे एकजंगी, बरास

– पैकी २ सेडे कितानी, ६ कपे एकजंगी एकूण ८

**गावी दमान (गावी म्हणजे परभानाच्या वर डोलकाठीच्या कळशीजवळचे शीड आणि दमान म्हणजे शिडाची दोरी)** – २ सेडे काथेरी, २ कपे एकजंगी, सीजी दोर – ४ दोरडी काथेरी, ८ कपे पैकी ६ दुजंगी २ एकजंगी. बटल्या ? – ४ सेडे काथेरी, १० कपे दुजंगी, इस्तंग्यास सामान – २ कितानी दोरडी, तण्यास ? – २ कितानी सेडे, १ घोडला कितनी २ मुतामे लाकडी

**गावीस** – ४ लंबराणे जोड्या किरकोळ, १६ मुतामे ? पैकी ८ लाकडी, ८ लोखंडी पट्याचे, ८ घोडले ?, फरोंदयास ? – २ कितानी सेडे, १६ कपे येकजंगी, ८ घोडले कितानी, ६ तुला कंप्यास एकूण ३२, विरे दोऱ्यास ? – १ सेडे मालदीवी, कपे येकजंगी एकूण ३

तपशील – किरकोळ ६ दोरे सेडे, १६ घोडले एकूण २२, १६ मुतामे ? – ८ लाकडी साधे, ८ लोखंडी पट्ट्याचे, १८ कपे एकजंगी,१ दोरडे काथेरी, ६ तुला कप्यांचे

**परभान गावीचे** : हांज्यास सामान – ४ सेडे काथेरी, ७ कपे पैकी ४ दुजंगी, ३ एकजंगी, २ तुला भोवर कड्यांस, मतेल्यास – २ कितानी सेडे, ६ कपे एकजंगी एकूण ८, लांस कपे एकजंगी, बरासास – २ कितानी सेडे, ६ कपे एकजंगी एकूण ८, तण्यास सामान – सेडे कितानी, १ घोडले ? किरकोळ, मुतामे लाकडी, सुरंज्या ? – २ कपे एकजंगी, २ सेडे काथेरी एकूण ४, इस्तंग्यास सामान – दोन सेडे काथेरी, ४ कपे एकजंगी, साबईस – २ दुजंगी कपे, २ एकजंगी कपे, १ कितानी दोरडे, १ फुरारी मालदिवी २ घोडले कितानी एकूण ८, बुलीणे ?– २ सेडे काथेरी, ६ कपे येकजंगी एकूण ८ , फोगी हांज्या – २ सेडे मालदीवी, ३ कपे एकजंगी एकूण ५, फोगी इस्तंग्यास – १ सेडा मालदीवी, ३ कपे एकजंगी एकूण ५, गावी दमानी – ३ दोरडी मालदीवी, २ कपे दुजंगी एकूण ५

**सबारास (सबार म्हणजे सबाय म्हणजे शिडाच्या काठीची दोरी)** – लंबराणास – २ किरकोळ जोड्या, ४ घोडले कितानी, ८ कपे एकजंगी, फरोद्या – २ किरकोळ जोड्या, ४ घोडले कितानी, ८ कपे एकजंगी एकूण १४, हांज्या – २ सिडे काथेरी, १ कपा एकजंगी एकूण ३ लंबराणास – १ कितानी, १ काथेरी, १ कपा एक्जंगी एकूण ३

**परभानास** – ३ मालदिवी दोरडे सेडे, मतेले – २ किरकोळ सेडे, ६ कपे एकजंगी एकूण ८, बारासास – २ सेडे काथेरी, ६ कपे एकजंगी एकूण ८, २ लांस कपे एकजंगी, तण्या – २ कितानी सेडे,

१ कपा एकजंगी एकूण ३, इस्तंग्यास – २ काथेरी, ४ कपे एकजंगी एकूण ६, दमानास – १ कपा एकजंगी, २ दोरडी मालदीवी एकूण २३

**कळंबी काठीस (मागच्या बाजूची काठी) – लंबराणास सामान** – १ किरकोळ, ४ काथेरी समेत फुरारी एकूण ५, मात जोड्या काथेरीस समेत फुरारी, मुतामे ? – १० लोखंडी पट्ट्याचे, १० लाकडी एकूण २०, घोडले किरकोळ ? , पेची दोर समेत तोल(तुला) – पैकी ८ पेची दोर, ८ तुला लोखंडी, आरवील किरकोळ ?, सबाईस सामान – १ दोरडे समेत फुरारी, २ कपे एकजंगी, २ कितानी घोडले एकूण ५

**परभानास** – ६ मुतामे लाकडी, ३ घोडले किरकोळ, मतेले – २ काथेरी समेत फुरारी, ४ कपे एकजंगी एकूण ६, २ लास कपे एकजंगी, बरास – २ कितानी सेडे, ४ कपे एकजंगी एकूण ६, साबई – १ दोरडे काथेरी समेत फुरारी, २ कपे एकजंगी एकूण ३. ३० रिकीते (कड्या) सेड्या किरकोळ, तण्यास? – २ कितानी सेडे, २ मुतामे लाकडी, १ घोड्ला कितानी, गावी दमानास – २ सेडे काथेरी, २ कपे एकजंगी एकूण ४, १ आरवील?, फोगीस – १ दोरडे काथेरी, २ कपे दुजंगी एकूण ३

**गावीस** – ३४ लंबराणे जोड्या काथेरी समेत फुरारी, मुतामे – ६ लोखंडी पट्ट्यांची, ६ लाकडी, फुरोद्या – ३ काथेरी समेत फुरारी, १२ कपे एकजंगी, ४ तुला लोखंडी, फोगी हांज्या – १ दोरडे काथेरी, १ कपा, १ तुला भोवरकडीस

**गावी परभान** – हांज्यास सामान – ४ दोरडी काथेरी, ८ कपे पैकी ४ दुजंगी, भोवर कडीचा, ३ साधे, ४ एकजंगी, मतेले किरकोळ – २ सेडे , ४ कपे एकजंगी, बुलीणे ? – दोन कितानी सेडे, ४ कपे एकजंगी, साबाई – १ दोरडे काथेरी, ३ कपे एकजंगी, तणी – २ सेडे, १ घोडला ?, २ मुतामे. इस्तंग्या– २ काथेरी, ४ कपे एकजंगी, गावी विरेदोरे – १ सेडा काथेरी , २ कपे एकजंगी, २ लास कपे एकजंगी

**सबार / सबई – लंबराणास** – २ किरकोळ जोड्या, ४ घोडले, ४ कपे एकजंगी . फरोद्या – २ किरकोळ जोड्या, ४ घोडले कितानी ८ कपे एकजंगी, १ सेडा, १ कपे एकजंगी. गावी दमान –२ दोरडी काथेरी, ३ कपे एकजंगी

**परभान** – हांज्यास – १ काथेरी दोरडे, २ कपे एकजंगी, मतेले – २ किरकोळ, ४ कपे दुजंगी, २ लास कपे येकजंगी, बरासास – २ सेडे कितानी, ६ कपे एकजंगी, तण्यास – १ कितानी, १ कपा एकजंगी एकूण २१

**मिजान परभान ढवूशाचे** – ८ दोरडी काथेरी, ३ कितनी सेडे, १७ कपे पैकी १ दुजंगी, १६ एकजंगी

**लाकडी वस्तू :** काठ्या – तीर्कती काठीस – ३ पुनईच्या, १ चंद्रजोती, ४ सागवानी एकूण ८ थोरली काठीस – ३ पुनईच्या, २ देवदारी, २ सागवानी एकूण ७, कळंबी काठीस – ५ पुनई, २ सागवानी एकूण २, १ निशाण काठी सागवानी, तण्या – १ थोरली काठीस १ तीरकत काठीस, १ कळंबी काठीस, ६ खुर्शा, काठीस व गावीस, ७ तोळा (तुला) लाकडी, १ सुकाण सरंजामसुधा, ६ गज तोफांचे, २ पालावरील डौर सरंजाम सुधा, २ सुकाणाचे हकारे? ३६ मजुरे तोफांची पिढी ?, २ बोही ? सरंजामसुधा, ४ झुज बोंब्यास समेत पाईल्या ?

**कापडी वस्तू** – शिडे – तीरकत काठीस ७, ८ थोरली काठीस, ५ कळंबी काठीस एकूण २०, निशाणे (झेंडे) – १९ मोठी कावल (कावेचा रंग दिलेली म्हणजेच भगवी), १ कळंबी झेंडा, २ वराच्या दन्नी, १ नालीवरील झेंडा एकूण २३

**इतर** – ७ चर्मी बालद्या, तोफांचे यान्यास, तुला लोखंडी, दोरडी नांगरास व पागेस – २ नांगरास मोठी पैकी १ कितनी १ मालदीवी, २ पागेस काप घाटी

याखेरीज महादेव पालासाठी एक मचवादेखील बनविला होता. हे जहाज आणि मचवा बनविण्यासाठी एकूण १२३० वस्तू वापरल्या गेल्या.

***

## धुळपांची समाधी स्थळे





प्रकरण १४ :

# आरमार शब्दकोश

विजयदुर्गाच्या मोडी कागदपत्रांतून मराठा कालखंडात आरमाराकडे नित्य वापरले जाणारे अनेक अपरिचित शब्द वाचायला मिळाले. विविध शब्दकोश आणि ना. गो. चापेकर यांनी लिहिलेल्या आरमारी शब्दांबद्दल माहिती या लेखात दिलेले शब्दार्थ यावर आधारित हे प्रकरण आहे.

**अ** : अवजार – शीड, अवदान – शीड **आ** : आफरादी तराडे – एकटे जहाज, आलाथ – वल्ह्याच्या काठीला लावण्यात येणारा रुंद पंखा **इ** : इद्रीस – मूळ शब्द अदरस म्हणजे ज्या दोरीने बोंबाचे शीड मोठ्या काठीस बांधतात ती दोरी, इस्तंग्या–दोरखंड **उ** : उडणी – मूळ शब्द उलंडी म्हणजे एक प्रकारचे लाकूड किंवा होडी कलंडू नये म्हणून जहाजाच्या एका बाजूला असलेला लाकडाचा सापळा, उतराण वारा – उत्तरेकडून वाहणारा वारा **क** : कपा किंवा कप्पी म्हणजे इंग्रजी भाषेत ज्याला पुली म्हणतात ती, कलफत – जहाजावरील लोहार, सुतार इत्यादी कारागिरांचे काम म्हणजे कलफत, कविले – मोठे खिळे, कळंबी काठी – जहाजाच्या मागच्या बाजूची काठी **का** : काड – दांडा, काथेरी दोरडी – काथ्याचा दोरखंड, कार – फिरस्त्या व्यापाऱ्यांचा तांडा, कारी – राळ **की** : कील – पाचर किंवा खुंटी **कु**: कुरवा – गलबताच्या पुढील खांद्यास आतल्या बाजूस लावतात ते लाकूड, कुंपा – मूळ शब्द कुंपी म्हणजे खुंटी, कुंभारु – जहाजावर ज्या ठिकाणी तोफ ठेवतात त्या ठिकाणास कुंभारु म्हणतात. **ख**: खजुरी – नक्षीदार, खटारा – जहाज **खु** : खुर्शा – मूळ शब्द खुरचा म्हणजे तुकडा **ग** : गर्भछाटी गोळे – शिशाचे तोफगोळे **गा**: गाबडे – खड्डा, भोक किंवा चीर बुजविण्यासाठी लावलेला तुकडा, गावी – डोलकाठीजवळचे शीड, गावी अवजार – डोलकाठीच्या कळशीजवळचे शीड, गावीची इस्तगी – गावी म्हणजे परभानाच्या वर डोलकाठीच्या कळसाजवळची शिडाची दोरी, गावी दमान – गावी म्हणजे परभानाच्या वर डोलकाठीच्या कळशीजवळचे शीड आणि दमान म्हणजे शिडाची दोरी, गावीची यारी – शिडाची दोरी **घा** : घामत – जहाजात साठलेले समुद्राचे पाणी **च** : चरशे – कातडी पिशवी, चवाटे सनगे – गाठोडे बांधण्यासाठी वापरले जाणारे कापड,

चिलप – लाकडाचे ढलपे, चिवले – जंगली बांबू, चुलेत्या – होडीचे वल्हे ज्या उभ्या दांड्याला टेकून खेचतात तो दांडा, चंद्रजोती – उडविल्यानंतर चंद्रासारखा प्रकाश देणारा व इशारतीसाठी वापरला जाणारा फटाका, चंद्रुस – मूळ शब्द चंद्रस म्हणजे राळ **जा** : जाब – लांबी मोजण्याचे परिमाण, नक्की किती अंतर हे मात्र समजत नाही, जामगी – तोफ डागण्याची बत्ती, जंजीरा – साखळ्या **झा** : झाऱ्या – वाकाच्या जोडणीचे लाकूड **ड** : डेरे – गोलाकार लाकडे **डो** : डोलकाठी – गलबतावर उभा केलेला शिडाचा खांब **ढ** : ढबूशा – जहाजाच्या मागच्या भागात असलेली खोली, ढोणे – पोर्तुगीज शिपाई **त** : तख्त – जमिनीचे लाकूड, तरण – होडी, जहाज, तरण्याचे साधन, तरफा – जड वस्तू हलविण्यासाठी त्याच्या खाली घालण्यात येणारा लाकडी दांडा **ता** : तामरात – डागडुजी करणे, गंज इत्यादी काढणे **ति** : तिर्कत किंवा तिर्कती – तीन शिडांचे जहाज **तु** : तुंग मारी तराडी – जहाजांचा समूह किंवा टोळी **तो** : तोग – तोफेचा साखळदंड, तोल किंवा तोला – तुला, वजन करण्याचा काटा **द** : दल – दल म्हणजे जहाजाचा गाभा म्हणजे आतील पोटाचा भाग, दमान – गलबताच्या मागील बाजूस सुकाणाकडे बांधलेली शिडाची दोरी, **दा** : दादरी – लहान जिना **दो** : दोरडे – दोरखंड **ध** : धडा – किनाऱ्यावर जहाज ठेवण्याची आच्छादित जागा **न** : नर–माद्या – एकमेकांत अडकविण्याचे साधन, नस्त – समुद्र **ना** : नाळी – गलबताचा पुढील बाजूचा टोकदार भाग, नाळीची सोबी – नाळीचे टेकण **प** : पठाण – मांडीच्या मागचे व गलबताच्या पुढच्या बाजूचा कणा म्हणून वापरले जाणारे लाकूड, पतींगे – वल्ह्याचे दांडे. परभान – मोठ्या शीडाचे लाकूड, परभान हांजा – परभान म्हणजे मोठ्या शिडाचे लाकूड आणि हांजा म्हणजे त्याचा दोरखंड **पा** : पाग – गलबत धक्क्याकडे आणण्याकरिता दोरी फेकतात ती दोरी, पाल – मोठे लढाऊ जहाज, पावडा – पावडा म्हणजे मोठा नांगर किंवा नांगराचा आकडा **पि** : पिंजरी – ध्वज उभा करण्यास केलेली चौकट **पु** : पुनई – जंगली झाड, **पे** : पेलणे – वजन म्हणून ठेवण्यासाठी वापरले जाणारे लाकूड, **फा** : फाणस कंदे – कंदील, फासळी – जहाजाचा सांगाडा **फि** : फिरंगी गोवेकर – पोर्तुगीज **फु** : फुरारा किंवा फुरास – मूळ शब्द फरारा म्हणजे दोरखंडाला गुंडाळण्याचे कापड किंवा निशाण **फो** : फोकी किंवा फोगी – गलबताच्या नाळावर असलेले त्रिकोणाकृती शीड **ब** : बरगे – वासे, बरास – दोरखंड **बा** : बारा – समुद्र, बालद्या – बादल्या **बो** : बोडद – जहाजाच्या उजव्या किंवा डाव्या बाजूच्या भागास बोडद म्हणतात. बोंब – नाळीच्या

टोकावरील लहान शिडाची काठी **भा :** भांडे – तोफ **भि :** भिंडी – भिंडी म्हणजे गोफण **भु :** भुरडा – नाळीच्या वरचा टोकाचा भाग **भो :** भोवर कडी – फिरविता येणारी लोखंडी कडी **म :** मतेले – मूळ शब्द मतेरी म्हणजे बोंबाचे शीड बांधण्याचा दोर हा मोठ्या डोलकाठीस बांधतात आणि तिसरे शीड उभाल्यावर नाळीस बांधतात, मंजील – मूळ शब्द मंजी म्हणजे गलबताचा एक प्रकार, मस्तूर – बारीक पण जाड दोरी **मा :** मात जोड्या काथेरी – मातण म्हणजेच जहाजाची गती बदलण्यासाठी शीड फिरविण्याचे दोरखंड काथ्याचे दोरखंड, मालके रांगा – पठाणाच्या दोन्ही बाजूच्या तीन लाकडी फळ्या, मालदीवी दोरडे – मालदीवी दोरखंड, मालमी पेटी – होकायंत्राची पेटी, मांदी किंवा मांडी – बुंध्याचे आडवे लाकूड **मि :** मिजाम अवजार – गलबताच्या मुख्य शीडापुढील शीड. असे शीड काही जहाजांना असते. **या :** यारी – यारी म्हणजे जड ओझे उचलण्यासाठी जे यंत्र वापरले जाते त्याला यारी म्हणतात **रा :** रायवळ – जंगली लाकूड **रे :** रेजगिरी – भडीमार **ल :** लटिंग – आखूड पण जाड लाकूड, लंबराण – जड पदार्थ उचलून ठेवण्यासाठीचा जहाजावरील दोरखंड **ला :** लांजा किंवा ल्हांजा – बोंबेच्या वरचे टोक **लो :** लोयली – लहान नांगर **व :** वरा – जहाजाची मागची बाजू **वा :** वाक – फासळे, वाव – लांबी मोजण्याचे परिमाण (एक वाव म्हणजे सुमारे पाच हात लांब अंतर) **शा :** शामल – सिद्दी **शि :** शिंके किंवा सिंके – शिडाची घडी ज्या दोरीने बांधतात ती दोरी, शिंगे – बंदुकीची दारू ठेवण्याचे शिंग **सा :** साबई किंवा सबार – मूळ शब्द सबाय म्हणजे शिडाच्या काठीची दोरी **सि :** सिके किंवा शिंके – मूळ शब्द शिकी म्हणजे गलबताच्या शिडाची गुंडाळी किंवा ती बांधण्याची दोरी, सिजी – दोरखंडाचा प्रकार, सिफा तेल – कडू किंवा कच्चे तेल, सिलाचे पाटे – सील या शब्दाचा अर्थ पाटा असाच आहे. शब्दकोशात याचा अर्थ होड्यांना नांगर म्हणून वापरला जाणारा लोखंडी तुकडा असा दिलेला आहे **सु :** सुकाण – जहाज वळविण्यासाठी जहाजाच्या मागच्या बाजूला असलेले साधन, सुबा किंवा सुंबा – तोफेत दारू ठासण्याची ठासणी **से :** सेडे – दोरखंड **सो :** सोबी किंवा सोबणी – पाण्याच्या टाकीखाली ठेवण्याचे टेकण **ह :** हकारणी – चालते करणे किंवा चालू करणे, हंदरवट – हंदरवट एक परिमाण, बहुदा हंदरवट म्हणजे खंडी आणि रात म्हणजे पायली **हा :** हांजा – दोरखंड **हे :** हेटचा वारा – दक्षिण दिशेचा किंवा खालच्या बाजूचा वारा

***

प्रकरण १५ :

# इतर, पण महत्त्वाचे

विजयदुर्गच्या मोडी कागदपत्रांतून इतर छोट्या-मोठ्या ज्या नोंदी आढळून आल्या त्याचा आढावा या प्रकरणात घेऊयात.

**आरमाराकडील जासूस -**

समुद्रावरील बेकौली जहाजांच्या आणि शत्रूंच्या म्हणजेच वलंदेज, पोर्तुगीज, इंग्रज आणि चाचे इत्यादींच्या आरमाराच्या काय हालचाली चालू आहेत, त्याच्या बातम्या काढण्यासाठी जासूस ठेवलेले असत. हे जासूस ज्या बातम्या देत त्यावरून मराठ्यांना आपल्या आरमाराच्या हालचालीची पुढील दिशा ठरविता येत असे. याविषयीच्या काही नोंदी पुढीलप्रमाणे - **मुरखान जासूस (इसवी सन १७६१-६२):** मूरखान नामक एका जासुसास गोव्याला बेकौली जहाजाच्या बातमीसाठी पाठवला होता. प्रवासात नदी, नाले उतरणे इत्यादींसाठी २ रुपये वाटखर्ची दिली. **व्यापाऱ्यांनी केलेली जासुसी (इसवी सन १७७१-७२) :** बुधवार २४ जुलै १७७१ रोजी सुरतेकडे स्वारी जात असता वाटेत कौली सावकारी डंग्या (व्यापारी गलबते) भेटल्या. त्यावरील कल्याणी सेठ गुजर आणि लालदास गुजर या कारांना (व्यापाऱ्यांना) सुरतला जाऊन बेकौली जहाजांची बातमी घेऊन यावी यासाठी १५ रुपये ११ आणे किंमतीची वस्त्रे दिली. **पंत अमात्य यांच्याकडील जासूस :** मंगळवार ३१ डिसेंबर १७७१ बावडेकर पंत आमात्य यांच्याकडून एक जासूस फिरंग्याची बातमी घेऊन आला होता. **देवजी पाटले :** रविवार, ५ जानेवारी १७७२ रोजी देवजी पाटले दिमत जेंजालदाज हा फिरंग्यांची म्हणजेच पोर्तुगीजांची बातमी घेऊन आला होता, **पुर्तकालहून आलेले जहाज (इसवी सन १७७४-७५) :** सोमवार, ९ जानेवारी १७७५ रोजी पुर्तकालहून तराडी लढवई (लढाऊ जहाजे) सामान व ढोणे (पोर्तुगीज शिपाई) भरून गोव्यास आले आहे अशी खबर समजली म्हणून बालोजी सिपी याला बातमी खरी आहे का खोटी आहे यासाठी पाठविले. त्याने सहावे दिवशी खबर आणली. सबब, त्याला ३ रुपये बक्षीस दिले.

**आरमाराकडील कैदी :**

आरमारी लढायांमध्ये शत्रूची जहाजे ताब्यात घेतल्यानंतर त्यावरील कप्तान, शिपाई इत्यादी लोकांना अटक करून विजयदुर्ग

इथे ठेवल्याचे उल्लेख सापडतात. तसेच त्यांच्या जेवणाखाण्याचा, जखमी लोकांच्या मलमपट्टीचा, औषधाचा खर्चही सरकारातून केला जात असे.

**पोर्तुगीजांचा पराभव, अटक आणि औषधोपचार (इसवी सन १७७१-७२) :**

यावर्षी मराठा आरमाराची पोर्तुगीजांसोबत जी लढाई झाली त्यात पोर्तुगीजांच्या जहाजावरील दारूच्या साठ्याला आग लागून जहाज जळाले. पोर्तुगीजांचा पराभव करून सर्वांना अटक करून आणले. अटक केलेल्या लोकांमध्ये मुख्य कप्तान, त्याची २ मुले, ४ कप्तान खुर्द (कप्तान खुर्द म्हणजे उप कप्तान किंवा छोटे कप्तान), १३ सारंग वगैरे भले माणूस, एक सिद्दी चाकर कप्तानाचा, १०७ शिपाई, ६५ किरीस्ताव (ख्रिश्चन), खलाशी इत्यादी एकूण १७२ लोक पकडले होते. यापैकी जहाजाला लागलेल्या आगीमुळे जे लोक जखमी झाले होते त्यातील २ जण मयत पावले.

**जखमी लोकांची जेवणाची व्यवस्था :**

या लढाईत जे लोक जखमी झाले होते त्यांना जेवणासाठी कोंबडीची अंडी दिली. फिरंगी कप्तानाच्या दोन मुलांना मेवा मिठाई दिली गेली. तसेच त्यांच्या जखमा स्वच्छ करण्यासाठी सरा दारू (पिण्याची दारू), जेवणाची व्यवस्था, पाणी पिण्यासाठी मातीची मडकी, औषधी लेप आणि त्यावरून बांधण्यासाठी कापड, इत्यादी दिले गेले. कप्तान जखमी होता त्याला औषधे, लेप, जखमांवर लावण्यासाठी मेण, आणि उशा, अंथरूण, पांघरुण इत्यादी दिले. तसेच ज्यांना जहाज जळाल्यामुळे भाजल्याच्या जखमा झाल्या होत्या त्यांना जखमांवर लावण्यासाठी गोडे तेल दिले.

**जखमांवर लावण्यासाठी बनविलेले मलम (इसवी सन १७७०):**

सुभेदार मोत्याजीराव विचारे हे उपर स्वारीस असताना वलंदेज म्हणजेच डचांसोबत झालेल्या लढाईत काही लोक जखमी झाले होते. त्यांच्या जखमांवर लावण्यासाठी दोन प्रकारचे मलम बनविण्यात आले त्यासाठी जे जिन्नस वापरले गेले त्याची यादी. **पहिल्या प्रकारचा मलम** - पत्री, शंखजिरे, मुडदाड शिंग, कलखवली, पिंपळी, बालहिरडा, कुटकी, हडकी, मालीबंद, तुरटी, मोरचूद, जायफळ, दालचीनी, कबाबा चीनी, गुगुळ, साखर चीनी, बिबवे, वेखंड, ओवा. **दुसऱ्या प्रकारचा मलम** - जायफळ, लवंग, इलायची कापूर, तूप, कात, मिरी, हळद, सुपारी, उद, धूप, साखर चीनी इत्यादी. तसेच फरासिसाचे (फ्रेंचांच्या) लढाईत लोक जखमी झाले त्यांच्या जखमा स्वच्छ करण्यास सरा दारू वापरली.

**इसवी सन १७७४-७५ :**

मराठा आरमारातील समशेरजंग पाल (लढाऊ जहाज) इंग्रजांचे लढाईत जळाले. त्यावरील लोकांना भाजल्याच्या जखमा झाल्या होत्या. त्यांना जखमांवर लावण्यासाठी मलम बनविले गेले. त्यासाठी जे जिन्नस वापरले गेले त्याची यादी – जायफळ ९ शेर, पत्री ९ शेर, पिंपळी ६ शेर, पिंपळमूळ ६ शेर मुर्दाडशिंग ९ शेर, कलखापरी ९ शेर, शंखजिरे ९ शेर, मोरचूद ९ शेर, तुरटी ९ शेर, बालहिरडा ९ शेर, काळे मिरे १ पायली, हळद १ पायली, ओवा पाव पायली, वेखंड पाव पायली, कबाब चीनी पाव पायली, मोलबंद पाव पायली, कात पाव पायली, सुपारी अर्धा पायली, मेण पाउण पायली अलालाकरा ९ शेर, भिलावे अर्धा पायली, खोबरे २ पायली, तूप ६ पायली. याशिवाय भाजलेल्या लोकांना कापूरमिश्रित तेल लावले जात असे.

**निशाणे :**

धुळपांच्या कार्यकाळात मराठ्यांच्या आरमारात जहाजांवर असणारी निशाणे म्हणजेच झेंड्यांविषयी जे उल्लेख कागदपत्रांमधून आढळून येतात त्याचा तपशील पुढे दिला आहे. त्यावरून मराठा आरमाराकडे कोणकोणती निशाणे वापरत असत, त्याची कल्पना यायला मदत होईल.

**इसवी सन १७८१-८२ :**

या सालातील कागदपत्रांतून गुराबावरील निशाणांमध्ये भगव्या निशाणाबरोबरच लाल व पांढऱ्या रंगाची निशाणे असल्याचा उल्लेख येतो. यामध्ये कळंबी काठीवरील १ ढाल (निशाण) पांढरी, मोठे काठीवरील १ ढाल खंडकीची (लाल रेशमी), दांडगे काठीवरील परभानावरील २ खंडकीची, ढाल वरावरील (जहाजाच्या मागच्या बाजूची) १ पांढरी , मोठ्या काठ्यांवरील २ पैकी १ खंडकीचे लाल, १ पांढरे आणि गावीवरील (शीडावरील) २ खंडकीची अशी एकूण ९ निशाणे गुराबावर असल्याचे उल्लेख सापडतात.

**जंजिरे अर्नाळा (इसवी सन १७८७-८८) :**

जंजिरे अर्नाळा येथे जे आरमार तैनात होते त्यातील फतेमारी जहाजावर ६ नवी निशाणे केली त्याचा तपशील पुढीलप्रमाणे : **भुरड्यावरील (नाळीच्या टोकावरील) निशाण दुजिभी** – ५ हात लांब आणि ४ हात रुंद, एकूण २० हात. **ढाल वरांची १ (जहाजाची मागच्या बाजूचे निशाण)** – ६ हात लांब, ४ हात रुंद एकूण २४ हात **डोलकाठीवरील झेंडा १ दुजिभी** – ५ हात लांब, ४ हात रुंद एकूण २० हात **कळंबी काठीवरील झेंडा १** – ४ हात लांब ४, ३ हात रुंद एकूण १२ हात **शिडाची २ निशाणे** – त्यात मुख्य शिडाचे निशाण

४ हात लांब, ३ हात रुंद एकूण १२ हात आणि कळंबीच्या शिडाचे निशाण ३ हात लांब, ३ हात रुंद एकूण ९ हात

**निशाण जमिनीवर पडले तर बकरे देण्याची पद्धत :**

शनिवार २७ जुलै १७७१ रोजी आरमार स्वारीवर दंडा राजपुरी येथे असताना जहाजांवरील निशाणे जमिनीवर पडली सबब बकरे दिले. कदाचित हा अपशकून मानला जात असावा.

**टोपीकरांसारखी निशाणे लावावी (इसवी सन १७६३-६४) :**

टोपीकरांच्या आरमारातील जहाजांच्या तळाशी म्हणजेच खालच्या बाजूला ज्याप्रमाणे निशाणे असतात, त्याप्रमाणे सरकारच्या आरमारातील जहाजांवर खालच्या बाजूस निशाणे असली तर सलाबत (छाप) भारी पडेल असे विजयदुर्ग येथून पेशव्यांना कळविण्यात आले. त्यावरून पेशव्यांनी इंग्रजांच्या जहाजांवर खालच्या बाजूस ज्याप्रमाणे निशाणे असत तशा पद्धतीने मराठा आरमारातील जहाजांवर खालच्या बाजूस मराठा आरमाराची निशाणे लावण्याची आज्ञा केली.

**नवीन आरमार उभारणीचा प्रयत्न (इसवी सन १७७९-८०) :**

या वर्षी देवसावंत परुळेकर यांनी नवीन आरमार उभे करण्याचा प्रयत्न केला. माहगिऱ्यांवर हत्यारबंद लोक चढवून समुद्रात सावकारांच्या जहाजांना अडथळा निर्माण करायला सुरवात केली. हे वृत्त कळल्यावर सरकारातून त्याच्या आरमाराची जप्ती झाली.

**सदाशिवराव भाऊंचा तोतया :**

मराठ्यांच्या इतिहासातील अत्यंत महत्त्वाचे युद्ध म्हणजे पानिपतचे युद्ध. हे युद्ध आणि त्याच्याशी संबंधित घडलेल्या अनेक घटना याविषयी आजही वेगवेगळ्या ऐतिहासिक मोडी कागदपत्रांतून अनेक नोंदी सापडतात. या युद्धानंतर घडलेली एक महत्त्वाची राजकीय घडामोड म्हणजे पानिपतच्या युद्धात श्रीमंत सदाशिवरावभाऊ पेशवे यांचा मृत्यू झाल्यानंतरही पुढील काही वर्षांत निर्माण झालेले भाऊंचे अनेक तोतये. यापैकी एका तोतयाविषयीच्या नोंदी विजयदुर्गच्या कागदपत्रांतून पाहायला मिळाल्या. हा तोतया सीत सबैनात (इसवी सन १७७५-७६) मध्ये विजयदुर्ग येथे आला होता. विजयदुर्ग येथे येण्याअगोदर तो प्रथम रत्नागिरीस गेला आणि रत्नागिरीहून राजापुरास गेला. राजापुराहून तो खारेपाटणास जाणार असे सुभेदार धुळप यांना समजल्यावरून सुभेदार आरमार घेऊन खारेपाटणास गेले; परंतु तोतया खारेपाटणास न जाता विजयदुर्गला आला. कदाचित त्याने धुळपांना चकवा देण्यासाठी खारेपाटणास जाणार अशी खोटी बातमी पसरवली असावी. धुळप कदाचित त्याच्या सदाशिवरावभाऊ असण्याच्या दाव्याला विरोध करतील किंवा विरोध करू नये म्हणून

ते विजयदुर्ग येथे नसतानाच येणे हिताचे ठरेल असे त्याला वाटले असावे. कारण त्याने आल्या आल्या पहिल्या दिवशीच संपूर्ण शहरात साखर वाटली. तोतया विजयदुर्ग येथे आल्याचे कळल्यावर सुभेदार लगोलग रात्रीच्या वेळेसच विजयदुर्गास आले. तोतया आधी विजयदुर्गवर आला. तो येणार म्हणून वाघीस (गलबतास) आतल्या बाजूने सुगंधी वस्तू वापरण्यात आल्या. त्यात सुगंधराज तेल, चंदन, कापूर, करचर इत्यादी गोष्टींचा समावेश होता. त्यानंतर गिरये येथील गोदीवर गेला आणि रात्रीच्या वेळेस सरकार वाड्यावर मुक्कामास राहिला. हा तोतया सुमारे चौदा दिवस विजयदुर्ग येथे होता. त्यानंतर विजयदुर्गहून यशवंती नावाच्या गलबतावर स्वार होऊन तो राजापुरास गेला. राजापुरास जाताना विजयदुर्ग जंजिऱ्यातून युद्धाचे आणि इतरही बरेच सामान घेऊन गेला.

**पार्वतीबाई पेशवे (इसवी सन १७६९–७०) :**

श्रीमंत सौभाग्यवती पार्वती बाईसाहेब श्री गणपती पुळे येथे दर्शनास आल्या तेव्हा आरमाराने तैनातीस जावे असे पत्र पुण्याहून पाठविले गेले. आरमार गणपती पुळे येथे गेले असता गुराब आनंदी प्रसादवर ११ चंद्रजोती लावल्या.

**सण उत्सव :**

आरमार तैनातीच्या ठिकाणी आणि वेळप्रसंगी स्वारीवर असताना समुद्रातही वेगवेगळे सण–उत्सव साजरे करण्यात येत असत – **गुढीपाडवा :** इसवी सन १७९२–९३ या सालातील सर्व स्वाऱ्या हरबाजीराव धुळप यांच्या नेतृत्वात झाल्या. स्वारीवर असताना गुढीपाडव्याचा सण आला त्यादिवशी पालावरच गुढी उभारली गेली. **नारळी पौर्णिमा :** नारळी पौर्णिमेला सोन्याचा मुलामा दिलेला नारळ समुद्रात सोडला जाई. **नवरात्री :** आरमारातील जहाजे, गुराब किंवा गलबतांना नवरात्रीच्या वेळेस फुलांच्या माळांनी सजविले जात असे. **दीपावली :** आरमार स्वारीवर असताना दिवाळीचा सण आला म्हणून गुराब शिवप्रसादवर दीप लावून दिवाळी साजरी केली गेली. (इसवी सन १७६९–७०) **संक्रांत :** करवीरकर छत्रपती यांच्याकडून मकरसंक्रमणाचे तीळ घेऊन हुजरे येत असत. याशिवाय होळी, इत्यादी सण विजयदुर्ग येथे साजरे केले जात असत.

**केवळ लढाई नाही तर वेळप्रसंगी मदतही :**

मराठ्यांचे आरमार म्हणजे लुटारूंचे आरमार अशी एक चुकीची प्रतिमा पाश्चिमात्य लोकांनी निर्माण केलेली आहे. त्याचेच प्रतिबिंब आजही थोड्याबहुत प्रमाणात उमटत असते. एक तर बेकौली जहाजे

धरून आणून जप्त करणे हा त्या काळातील शिरस्ताच होता. ज्याचे आरमार जास्त ताकदवर त्याची समुद्रावर सत्ता असे. मराठ्यांचे आरमार हे एक बलाढ्य आरमार होतेच त्यामुळे मराठ्यांचीच निर्विवाद सत्ता भारताच्या पश्चिम किनारपट्टीवर होती. मराठ्यांचे आरमार शत्रूपक्षाच्या आरमाराशी म्हणजेच इंग्रज, वलंदेज, फिरंगी गोवेकर म्हणजेच पोर्तुगीज यांच्याशी केवळ लढायाच करत नसे तर वेळप्रसंगी त्यांना मदतही करत असे. हे स्पष्ट करणाऱ्या नोंदी विजयदुर्गच्या कागदपत्रांतून आढळल्या. बऱ्याच वेळेस इंग्रज, पोर्तुगीज इत्यादी सत्तांशी तह झाला असेल अशा वेळेस संघर्ष होत नसे. तसेच आरमारातील जहाजांनी स्वारीवर असताना चुकून मित्रपक्षाशी लढाई करून जहाज इत्यादी पकडून आणले तर ती जहाजे नंतर सोडून दिली जात असत.

**एकमेकांची जहाजे सोडून दिली (इसवी सन १७८१–८२) :**

फिरंगी गोवेकर म्हणजेच पोर्तुगीजांचे वेताळ गलबत इसवी सन १७८० मध्ये देवदुर्गच्या समुद्रावर उलटले आणि त्यावरील लोक समुद्रात बुडून मेले. उलटे झालेले गलबत दर्यात वाहत होते. याचवेळेस मराठा आरमाराचे वावडी नावाचे गलबत दर्यात छबिना म्हणजेच गस्तीवर असताना उलटलेले वेताळ गलबत मराठ्यांच्या दृष्टीस पडले. मग मराठ्यांनी वेताळ गलबत ओढून बंदरात आणले. पुढे पोर्तुगीजांनी पेशव्यांना जाऊन ही घटना सांगितली त्यावरून ते गलबत सोडून देण्याचा हुकूम झाला; परंतु एक वर्षे आधी मराठा आरमाराची पाच गलबते फिरंगी यांनी गोव्यास पकडली होती त्याविषयी सरकारात कळविले. मग पोर्तुगीज आणि मराठे यांच्यात विचारविनिमय होऊन एकमेकांची गलबते सोडून दिली.

**राघोजी आंग्रे (इसवी सन १७७१–७२) :**

राजश्री राघोजी आंग्रे यांच्याकडील गलबते जंजिरे मजकुरी आली होती त्यांना आवश्यक त्या वस्तू दिल्या. चंद्रजोती बनविण्याचा कारखाना – विजयदुर्ग येथे चंद्रजोती व नळे बनविण्याचा कारखाना होता. रायापा जैन हा माणूस चंद्रजोती बनवित असे. या चंद्रजोती बनविताना रवाळ माती वापरली जात असे.

**आनंदराव धुळप यांच्या सोबत आरमाराकडे असलेले इतर सरदार (इसवी सन १७६३–६४) :**

बहिर्जी नाईक पोटे, बावाजी नाईक मयेकर, बावाजी नाईक भाटकर, बळवंतराव भास्कर, बाजी नाईक फाटक, येसवंतराव गायकवाड, विसाजी नाईक बिरजे, विठोजी पडवळ, रामजी गावखडकर, दामाजी कुवेसकर, कृष्णाजी नाईक जैतापूरकर, कृष्णाजी सातारकर, कृष्णाजी

वानरे, मानाजी शिंदे, गोदजी नाईक पेडणेकर, गोपालजी अफोडकर, गोपाळजी फाटक, गोदजी राउत, गणोजी नाईक भाटकर, हरजी पाटले, हरजी कलगुडे, शिवाजी केशव, मालजी वेतकर, हरबाजी नाईक सरमंडलिक, सेख आदम.

**चावीचे वजन (इसवी सन १७९५-९६) -**

१) नारायण पालाच्या गावीची (शिडाची) लोखंडी चावी तिचे वजन १ मण ५ पायली इतके होते.

**हणमंतगिरी गोसावी :**

रविवार, ९ नोव्हेंबर १७७७ या दिवशी हणमंतगिरी गोसावी यांनी मौजे वाइंगणी तर्फ सालसी येथे समाधी घेतली. त्यासाठी ५ चंद्रजोती आणि ५ पायली दारू दिली.

**सती :**

रविवार १४ डिसेंबर १७७७ या दिवशी गंगाई बाणी ही सती गेली. त्याच्या साहित्याबद्दल खर्च दिला.

**बंदुकीच्या गोळ्यांचा साचा (इसवी सन १७९३-९४) :**

बंदुकीच्या गोळ्यांचा पंचधातूचा साचा बनविला.

***

## * समारोप *

मराठ्यांचे आरमार The धुळप'S Era पुस्तकाचा समारोप करत असतानाच एक शक्यताही वर्तवत आहे की, कदाचित या पुस्तकाचा दुसरा भागही येऊ शकेल. याविषयी अजून काही हजार कागदपत्रे तपासल्यावर ठामपणे सांगू शकेन. आंग्रे घराण्यानंतर धुळप घराण्याचे मराठा आरमाराप्रती असलेले योगदान, त्यांचा पराक्रम यावर या पुस्तकातून प्रकाश टाकण्याचे सौभाग्य मला मिळाले, ही परमेश्वराची कृपाच आहे! याबाबत मी स्वतःला भाग्यवान समजतो. तसेच आरमाराचे अर्थकारण, समुद्री लढाया आणि त्यांचे तंत्र, वादळात अडकलेल्या जहाजांच्या कथा, जहाज बांधणी व त्यांची देखरेख, तत्कालीन सामाजिक घटना अशा एक ना अनेक घटनांविषयक अपरिचित माहिती या पुस्तकातून वाचल्यानंतर वाचक नक्कीच सुखावले असतील, यात कोणतीही शंका नाही. ही सागरी सफर तुम्हाला कशी वाटली, ते मला जरूर कळवा. धुळप घराण्यातील सर्व पराक्रमी पुरुषांना मानाचा मुजरा करून पुस्तकाचा समारोप करतो.

***

## परिशिष्ट १

संदर्भ सूची :


१) पुणे पुरालेखागार येथील पेशवे दप्तरातील विजयदुर्गचे मोडी कागद

२) मराठी रियासत खंड ४ व ५ · गो. स. सरदेसाई

३) पेशवे दप्तर खंड २४ गो. स. सरदेसाई

४) ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी : गो. स. सरदेसाई

५) काव्येइतिहास संग्रह ऐतिहासिक लेख, पत्रे, यादी · गो. स. सरदेसाई, या. मा. काळे, वि. स. वाकसकर

६) मराठा कुळांचा इतिहास : गोपाळ दाजीबा दळवी

७) कुलाबाकर सरखेल आंग्रे, आंग्रे घराण्याचा इतिहास : दामोदर गोपाळ ढबू

८) आरमारी शब्दांबद्दल माहिती (भा.इ.सं.मं., त्रैमासिक इ.स. १९२६ : ना. गो. चाफेकर

९) ऐतिहासिक शब्दकोश · य. न. केळकर

१०) मोल्सवर्थ शब्दकोश

**ऐतिहासिक मोडी कागदपत्रांमध्ये उल्लेख असणारी काही प्रमुख सागरी ठिकाणे व बंदरे (इ.स. १७६० ते १७९५)**

⚓ : बंदराचे चिन्ह

अ
र
बी
स
मु
द्र

१. सुरत ⚓
२. अर्नाळा ⚓
३. वसई ⚓
४. वेसावे ⚓
५. साष्टी ⚓
६. मुंबई ⚓
७. बोरे (बोरी) ⚓
८. कुलाबा ⚓
९. खांदेरी
१०. थळ ⚓
११. चेऊल ⚓
१२. राजापुरी ⚓
१३. श्रीवर्धन
१४. हरेश्वर
१५. केळशी
१६. सुवर्णदुर्ग ⚓
१७. दाभोळ
१८. गोपाळगड
१९. भीम ⚓
२०. पालसेत ⚓
२१. वेळणेश्वर
२२. कराडेश्वर
२३. जयगड ⚓
२४. रत्नागिरी ⚓
२५. पावस ⚓
२६. पूर्णगड ⚓
२७. आंबोळगड ⚓
२८. विजयदुर्ग ⚓
२९. गिरये
३०. देवगड
३१. कुणकेश्वर
३२. आचरे ⚓
३३. मालवण ⚓
३४. कोचरे ⚓
३५. निवती
३६. यशवंतगड ⚓
३७. रेडी
३८. पणजी ⚓
३९. गोवे ⚓
४०. जुवे गोवे
४१. हेलमांडवी ⚓
४२. कांगी
४३. सिवेश्वर
४४. कारवार ⚓
४५. अंकोले ⚓
४६. गोकर्ण-महाबळेश्वर
४७. हुनावर ⚓
४८. भटकळ
४९. बसनूर ⚓
५०. बेसाडी
५१. मंगळूर ⚓
५२. मंजेसर ⚓
५३. रामतली
५४. कन्नानोर (कन्नूर) ⚓
५५. तालचिरी ⚓
५६. कलीकोट ⚓
५७. कोची ⚓
५८. कन्यापूर ⚓

